# अस्मिता

[ निवडक कवितांचा संग्रह ]

कवि

शि. अ. लुकतुके

परिचय

प्रा. वि. ह. कुलकर्णी

स्कूल व कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर

किंमत २ रुपये

कै. अप्पा व ती. आई

यांच्या

अनन्यसाधारण अपत्यप्रेमास

ही माझी

अस्मिता

अर्पण

# चार शब्द

सावंतवाडी हायस्कूलमध्यें शिकत असतांना माझे मराठीचे व्यासंगी शिक्षक कै. गुरुवर्य दामले यांच्या अध्यापनानें काव्यवाचनाची व स्वतः रचना करण्याची गोडी लागली. आज एक तपाहून अधिक काळानंतर या काळांतील रचना अंशतः तरी पुस्तकरूपांत वाचकांसमोर येत आहे. अशा वेळीं पितृतुल्य प्रेमबुद्धीनें माझ्या रचनेचें वेळोवेळीं कौतुक करणारे दामले मास्तर हें पुस्तक पाहायला नाहींत हा विचार मन अस्वस्थ करतो.

माझ्यासारख्या अज्ञातनामधेयाचें हस्तलिखित चाळूनच नव्हे तर अभ्यासून, पूर्व-परिचय कांहींहि नसतां, मराठी वाङ्मयाचे एक साक्षेपी समीक्षक प्रा. वि. ह. कुलकर्णी यांनी सविस्तर परिचय लिहून देण्याचें मनावर घेतलें, आणि आपल्यामागील अनंत उपाधींतून सवड काढून मला प्रकाशन क्षेत्रांत पाऊल टाकण्यास अवश्य ती शिदोरी पुरविली. श्री. दा. ना. मोघे यांसारखा आस्थेवाईक नि उत्साही प्रकाशक मिळाला; या सार्‍या गोष्टींमुळेंच आज हें पुस्तक प्रकाशांत येऊं शकलें आहे.

त्याबरोबरच, मला पुस्तक-प्रकाशनास्तव सतत प्रेरणा देत राहणारे माझे प्रेमळ पूर्वविद्यार्थी श्री. शंकर टिळेकर, श्री. ज. द. कुलकर्णी व श्री. आंबेकर यांनाहि मी या क्षणी विसरूं शकत नाहीं. राजापूर हायस्कूलचे पूर्वविद्यार्थी श्री. गजानन तावडे यांनीं हौसेनें आकर्षक कव्हरचित्र तयार करून दिलें आहे. राजापूर हायस्कूलचे कलाप्रेमी मुख्याध्यापक श्री. सरदेशपाण्डे व माझे इतर शिक्षक स्नेही यांनीं वेळो-वेळीं मला मार्गदर्शन केलें आहे. या सर्वांच्या अकृत्रिम लोभाचें ऋण सदैव मजपाशीं बाळगण्यांतच मला आनंद आहे.

पुस्तकाची छपाई अल्पावधींत निर्मळ करून दिल्याबद्दल ' समर्थ भारत प्रेस'चा व सुंदर ब्लॉक्स करून दिल्याबद्दल के. जोशी आणि कंपनीचा मी आभारी आहें.

काव्यरसिक मराठी वाचक या माझ्या चिमुकल्या पुस्तकाचें कौतुक-बुद्धीनें स्वागत करतील अशी आशा व्यक्त करून हे चार शब्द पुरे करतों.

राजापूर
१२ एप्रिल १९५५

शि. अ. लुकतुके

# परिचय

आकाशाच्या पोकळींत अनंताचा वेध घेणाऱ्या वृक्षाकडे पाहून क्षणभर मन स्तंभित होऊन जातें, व पहिलें आश्चर्य कांहींसें ओसरल्यावर अंतः-करण कांहींशा अनिर्वचनीय आनंदानें भारावून जातें. वृक्षाचा विस्तार, त्याची उंची, त्याचीं इतस्ततः जमिनींत खोल गेलेली पाळेंमुळें, त्याचा एकंदर डौल आणि त्याच्या स्वैर विस्तारांतील वैचित्र्यांतहि आढळून येणारी एकरूपता पाहून मनांत आनंदाबरोबर इतर संमिश्र भावनांचाहि कल्लोळ उत्पन्न होतो. पण अशा प्रकारच्या उदात्त आनंदाला कारणीभूत होणाऱ्या वृक्षावरून नजर वळवून घराजवळील बागेंत परिस्थितीप्रमाणें वळण घेत पण प्रकाशाकडे तोंड फिरवून वाढणाऱ्या वेलींकडे व फुलझाडांकडे दृष्टि फेंकली तरीहि मनाला कौतुक किंवा आनंद झाल्याशिवाय रहात नाहीं. कांहीं फुलांवरील विविध रंगच्छटांनीं व कांहींच्या सुगंधानें मन मोहून जातें. हरतऱ्हेचे आधार घेत वळणावळणांनीं स्वतःचा मार्ग शोधून काढण्यासाठीं धडपडणाऱ्या वेलीकडे पाहून मोठी मौज वाटते. तिच्या नागमोडी गतींत मोठा रेखीवपणा नसला तरी जीवनांतील अवखळ उत्साह असतो. मधून मधून डोकावणाऱ्या नाजूक फुलांमुळें तिनें आपल्या मर्यादित आयुष्यांतील धन्यतेचे-कृतार्थतेचे-क्षणहि अनुभविले असले पाहिजेत, याची खात्री पटते. वळणावळणांनीं आयुष्यमार्ग आक्रमित असल्यामुळें तिच्या जीवनांत कोठें कोठें गुंतागुंत उत्पन्न झालेली आढळली तरी तिच्या विकासशील जीवनाचा आलेख घेतां येतो.

श्री. लुकतुके यांच्या काव्यसंग्रहांतील कविता वाचतांना अशाच प्रकारचा आनंद झाल्यावांचून रहात नाहीं. ते कोंकणांतील खेडेगांववजा शहरांत शिक्षकाचा पेशा पत्करून संसार करणारे सुसंस्कृत व सात्त्विक वृत्तीचे गृहस्थ. त्यामुळें त्यांच्या आयुष्याला परिस्थितीच्या मर्यादा

पडणारच. परंतु असें असूनहि कडेकपाऱ्यांतून खळखळणाऱ्या निर्झराप्रमाणें त्यांच्या कवित्वशक्तीनें जी प्रगति केली आहे ती पाहून कौतुक वाटतें. त्यांच्या कवित्वशक्तींत नैसर्गिक जिवंतपणा आहे याचा प्रत्यय आल्यामुळें मन उल्हसित होतें. त्यांची कवित्वशक्ति नैसर्गिक आहे तशीच ती संस्कारक्षमहि आहे. परिस्थितीमुळें अपरिहार्यपणें पडणाऱ्या मर्यादा ओलांडून पलिकडे जाण्यासाठीं धडपडणाऱ्या त्यांच्या प्रतिभेची प्रगमनशील वृत्ति हीच त्यांच्या भावी यशाची आणि उत्कर्षाची ग्वाही देण्यास समर्थ आहे. त्यांच्या या पहिल्या काव्यसंग्रहाला प्रस्ताव लिहिण्यास मी प्रवृत्त झालों तो यामुळेंच.

कोकणची जमीन खडबडित व खडकाळ असली तरी तेथील निसर्गसौंदर्य रुक्ष मनांतहि कवित्वाचे अंकुर फोडील असें उन्मादक आहे. तेव्हां जातीचा कवि या सौंदर्यानें वेडावून जावा हें अगदीं स्वाभाविक आहे. दक्षिणसागरांतून कावडी भरून व्योमपथाचे वारकरी पर्वत शिखरांवर अभिषेक करूं लागले म्हणजे कवीचें मन पुलकित होतें, पवित्र होतें, पण असें असूनहि त्याला एक प्रकारची धुंदी चढते. 'नच पूर्वीं नच नंतर' या कवितेंत कवि म्हणतो—

तया सुमंगल स्नानीं
न्हाणवलीच्या अंगावरचें सुगंधलेपन
दरवळून राहतें हवेमधिं
करिती दर्दुर मंगलमंत्रांचें उच्चारण!
झाडाझुडपांमधुनी
सहस्र उन्मेषांनीं अपुल्या
रचित काजवे मोहक रोशन!
तया क्षणाची, आनंदाची ती अनुभूती
नच पूर्वीं, नच नंतर!
वरुणराज मग
नव्या दमाचा नव्या रंगेचा!

धरितो दृढ खेवेंत धरित्री
आणि ओतितो तिचिया गात्रीं—
नव–जीवन–कण !
त्या पहिल्या खेवेंतिल
ती अनुभूति अन् तें स्पंदन !
नच पूर्वी, नच नंतर !!

माड आणि पोफळी म्हणजे तर कोंकणांतील कल्पवृक्ष आणि कल्पवेली. पण या कल्पवृक्षांत सौंदर्यापेक्षां उपयुक्ततेचा भाग अधिक. कोंकणांतल्या लोकांच्या जीवनाचे हे एका अर्थानें आधारस्तंभ. खडतर आयुष्यांतील दु:सह दु:खांचा विसर पाडण्यासाठीं पूर्वी हे तेथील लोकांच्या मनाला गुंगी आणि धुंदीहि आणीत असत; परंतु आतां हे आपल्या अमृततुल्य पाण्यानें जीवनांत माधुर्य आणि टवटवी आणण्याचेंच काम करितात. कवीच्या सुसंस्कृत मनाला मात्र हे माड जटाधारी तपस्व्यांप्रमाणें वाटतात; कोंकणच्या सुपुत्रांच्या कष्टमय पण झुंजार वृत्तींचीं प्रतीकें वाटतात. पोफळीच्या बनांत चंद्रिकेच्या छायाप्रकाशाचा खेळ पाहून कवीचें मन आनंदानें वेडावून जातें. रातराणीच्या मादक सुगंधानें उन्माद पावलेल्या त्याच्या मनाला तिच्या गाढालिंगनांत पञ्चत्वीं लय पावण्याची स्वाभाविक आतुरता निर्माण होते. सावरीच्या रेशमी बोंडांतून बाहेर पडून हवेंत तरंगणाऱ्या म्हाताऱ्या पाहून संसारपंकांत रुतलेल्या मानवी म्हाताऱ्यांची कवीला आठवण होते आणि या विरोधानें त्याचें मन व्यथित झाल्या-वांचून राहत नाहीं. दारिद्र्यामुळें गांवांतील बहुसंख्य लोक देशोधडीस लागल्यामुळें ग्रामीण जीवनास आज जी भेसूर अवकळा आली आहे त्याचा विरोधालंकारानें कवीस प्रत्यय येतो—

वडाचें झाड ! वडाचें झाड
केवढा बुंधा ! केवढी वाढ
गुम्फुनी मुळें, अंगाभोंवतीं
कुटुंबापरी एका थाटती
त्यांतून होय केवढें काण्ड ॥

शाखाविस्तार, उंच आभाळीं
पारंबी तरी, ओथंबे खालीं
जन्मभूमीकडे, केवढी ओढ! ॥

परंतु आज घरोघर फक्त म्हाताऱ्या स्त्रिया दारापुढतीं वात सारीत आहेत आणि क्वचित् एखादी तरुणी भावी सुखाशेनें त्या वटवृक्षाभोंवतीं प्रदक्षिणा घालीत आहे. उध्वस्त खेड्यांतील हें दृश्य जितकें उदास तितकें रम्य आहे आणि म्हणूनच मधून मधून कवीला शहरांतील यांत्रिक, चंचल आणि अश्रद्ध राहणीचा त्याग करून खेडेगांवांतील शांत, स्थिर अन् श्रद्धाळू वातावरणाचा आसरा घ्यावासा वाटतो.

शहरांतिल बहुरूपी जीवन
रंग बदलतें कसें क्षणोक्षण
भावांच्या चढउतारांवरी
असहायपणें राही टांगुन
तिथें 'काल'ची कबर बांधुनी
'आज' महाल वरि रचितो नूतन
धाव तेथली भोंवळ आणी
श्रद्धा पडते ढांसळून अन्

परंतु खेडेगांवांत जातांच—

तेथिल स्थिरता तेथिल शान्ति
अनुभवुनीयां टवटवतें मन

गांवांतील परिचित स्थळांचें दर्शन घेत व व्यक्तींचे परिचित पण प्रेमळ प्रश्न ऐकत कवि आपल्या घरीं पोंचतो—

आणि घरीं पाऊल ठेवितां
गमे होतसे पुनरुज्जीवन
तें घर, परसूं-परडें पाहुन
तसेंच दारींचें वृन्दावन

निसर्गसृष्टीप्रमाणें बालसृष्टीहि तिच्यांतील स्वच्छंदी पण निरागस जीवनामुळें मनाला मोहविणारी असते. "माझी पबी" या कवितेंत लहानग्या मुलीच्या संसाराचें मोठें गमतीदार चित्र पहावयास मिळतें. पबी वयानें लहान असली तरी तिच्या संसाराचा व्याप फार मोठा.

आवरीतां संसार तिचा सारा
कुटुंबाचे वाजतां तीन तेरा
बोळकीं तर एवढाएवढालीं
त्यांत शिजविल तरि किती ती बिचारी

जेवणावळी घालतांना तर तिची फारच धांदल उडायची. 'आणखी वाढ' म्हणून सर्वांचाच तगादा; त्यांत कुणी रडणार, तर कुणी रुसणार त्यामुळें—

थारवीतां त्या सर्व लेकरांस
पबी येते स्वतःच की रडीस

आजच ती न्हाऊन घरांत आली तों तिचें एक बाहुलें अकस्मात् रडूं लागलें. तिचें रडणें जरी कुणाला ऐकूं आलें नाही तरी पबीचा जीव मात्र खालींवर होऊं लागला, आणि मग—

टुवालाचा मग पदर घेउनीया
लावि पोरातें तयाखालीं प्याया
नेसणें मग तिज कसें तरि सुचावें?
नेसण्याचें राहून कां न जावें?

बालकाचें जग सामान्यतः आनंदाचें असलें तरी गरिबीच्या संसारांत मुलांच्या वांट्याला प्रेमाबरोबर मारहि मिळावयाचा आणि वेळप्रसंगीं हा मार मुलाचा कांहीं अपराध नसतांनाहि त्याला मिळावयाचा. अशा प्रसंगीं आईला आई न म्हणणारीं मुलेंहि आढळायचीं. आईच्या आपल्या मुलासंबंधींच्या अपेक्षा, प्रौढ मुलांच्या मातृत्वाच्या थोरवीसंबंधींच्या भावना, नातवंडांना कसें वागवावें यासंबंधीच्या आजीच्या कल्पना, आणि या सर्व प्रसंगांतून दृग्गोचर होणारी मातापित्यांची नैसर्गिक वत्सलता या सर्वांचें मनोरम चित्रण या प्रकारच्या सर्व कवनांतून प्रत्ययाला येतें.

मध्यम वर्गीय कुटुंबांतील तरुणतरुणींच्या वांट्याला प्रेमाचे, विरहाचे आणि सांसारिक सुखदु:खांचे जे विविध अनुभव येतात त्यांवर प्रस्तुत संग्रहांतील अनेक कविता आधारलेल्या आहेत. यांत प्रणयाची माधुरी, धुंदी, आतुरता आणि समाधान-वृत्ति यांच्या छटा जशा रेखाटल्या आहेत तशाच प्रेमाच्या विफलतेच्याहि नाना तऱ्हा चित्रित केलेल्या आहेत. 'राया गुपित आपुलें' या कवितेंतील विवाहित स्त्री आपल्या चोरट्या प्रेमाची वाच्यता न करण्याविषयीं प्रियकरास बजावते. एक शब्द जरी अभावितपणें उच्चारला गेला तरी आपल्या गळ्याला फांस लागेल अशी तिला धास्ती वाटत आहे.

कारण—

न्याय जगाचा आंधळा  निष्पापांचें रे दळण
नीच श्वान आणि करी  सुखें यथेष्ट भोजन
माझ्या आशाआकांक्षांची  ज्यानें केली सारी माती
त्याच्या नांवें मिरविणें  हें मंगलसूत्र कण्ठीं
ज्याच्या स्पर्शानेंच निघे  रोमरोमांत शिसारी
त्याच्या वासनांतें देणें  करूं तांडव शरीरीं

पण—

पाप वा अन्याय सारे  प्रकाशींच जन्मतात
पांघरूण अंधेराचें  विश्व घालितें पोटांत

आणि म्हणून—

तुझ्या चोरट्या प्रीतीची  मज सारी सारी आस
गुपित उघडशील  करशील सत्यानाश

ही झाली प्रेमाच्या विफलतेची कहाणी. सामाजिक नीतीच्या चौकटींत गुदमरत राहण्याचेंच बहुतेकांच्या नशिबीं येतें. 'मी परक्याची' या कवितेंतहि अशाच पिचलेल्या मनाचें स्पंदन जाणवतें, परंतु त्यांतील स्त्री आपलें दुःख मनांतल्या मनांत ठेवून आपलें अंतरींचें प्रेम अलगपणाच्या सेवावृत्तीनें व्यक्त करूं इच्छिते—

तुझीं अंगणें मोदें झाडिन
करीन दारीं सडासारवण
तुझीं बालकें तशीं खेळविन
वस्त्रें धुविनहि तुमचीं! मी परक्याची!

आणि अशा रीतीनें—

दाबुनि वडवानल पोटींचा
हंसत सिंधु का जसा सदाचा
बघुनि समागम विधुरोहिणिचा
वृत्ति धरीन तयांची

असें कांहींशा अनपेक्षित अलंकारिक भाषेंत आपली समाधानी त्यागी वृत्ति प्रगट करिते. तथापि अशा स्त्रीसमूहांत पारंपारिक नीतिनियमांचें उल्लंघन करून आपल्या प्रियकराच्या बाहुपाशांत पडण्यासाठीं त्याच्या घरीं अवेळीं जाण्याइतकी धीट तरुणीहि क्वचित् आढळते. 'येउं कशी आंत' या कवनांत अशाच प्रमदेचें चित्र रेखाटलें आहे. मध्यम वर्गातील स्त्रियांच्या व्यक्तिजीवनाकडून 'ती उफाड्यांतली पोर' या रानकिशोरीकडे वळलें म्हणजे उन्मादक तारुण्याचा एक निराळाच नमुना पहावयास मिळतो.

ती उफाड्यांतली पोर
पाहिली न तोंवर वैराग्याचा जोर
मुख सतेज अवयव सारे बांधेसुद
वर्धिष्णु स्तन तव कर करतिल उन्मद
सौंदर्य निरामय मूर्त बघुनि भूतलीं
सारांश पौरुषीं निज व्हावा क्षण जवानही माजोर

सांसारिक जीवनांत आपला दैनंदिन आयुष्यक्रम घालवीत असतांनासुद्धां सुसंस्कृत मनुष्याच्या संस्कारक्षम मनावर तत्कालिन राजकीय आंदोलनाचे ठसे उमटल्यावांचून राहात नाहींत. प्रस्तुत संग्रहांतील स्वातंत्र्यगीतें कवीच्या राष्ट्रीय भावना प्रकट करतात. 'राष्ट्रदेवो भव,' '९ ऑगस्ट ४२' 'क्रान्तिवीरांस वंदन' 'माघ वद्य नवमी' 'येथें भव्य हिमाद्रि' वगैरे

गीतांत या राजकीय आंदोलनांचें सरमिसळ स्वरूप प्रतिबिंबित झालेलें आढळतें. यांतील कांहीं गीतें Marching Songs च्या थाटाचीं असून तीं सांघिक भावना उद्दीपित करण्यास समर्थ ठरावीं अशीं ठसठशीत उतरलीं आहेत.

विनोदी चुटके म्हणून कांहीं कविता निर्देशिण्यासारख्या आहेत. 'खेडेगांवांतील सलून' मध्यें आधुनिक उपकरणांच्या पार्श्वभूमीवर जीं नानातऱ्हेचीं देवादिकांचीं आणि राष्ट्रपुरुषांचीं चित्रें भिंतीवर लटकावलेलीं आढळतात तीं पाहून कवि म्हणतो—

सलून खेडेगांवांमधलें
जुन्या जगांतील नव्या युगांचें—
ठाशिव पाऊल

येथें पंचक्रोशीमधील वार्ता देणारीं चालतीं बोलतीं वर्तमानपत्रें आढळतील, तर वर भिंतीवरील तसबिरींत महात्मा गांधीसमवेत नेताजी, सुभाषचंद्र आणि दत्त व महादेवहि दर्शन देतील. अशा रीतीनें—

नव्या जुन्यांचा निजा-परांचा
संगम ऐसा पहाल कोठें ?
बोला बोला !

बेमालुम हा संस्कृतिसंगम
देइल दर्शन येथ मनोरम
उघडा डोळा

'जाहीर सभेंत' एक भाडोत्री देशभक्त देशांतील अन्नधान्य परिस्थितीचें गांभीर्य लोकांना समजावून सांगण्यासाठीं तालुक्याच्या गांवीं आला असतां—

सभा चालकांचे आणि टोळकें
श्रोतयांची वाट पहात आहे,
मुद्रेनें गंभीर अन् धीरोदात्त !

अशी स्थिती असते, आणि—

जरा वेळानें सभा सुरू होत
पाहून पाहून श्रोत्यांची वाट!
मंडपांत आतां बैसलीं दिसतीं–
कांहीं शाळू पोरें,
आणि स्कूल बोर्डामधल्या, उमद्या शिक्षिका,
हजेरी आपुली लावित आहेत!

अशा वेठीनें धरून आणलेल्या श्रोत्यांसमोर वक्ता बोलत आहे—

'अन्नधान्य स्थिति गंभीर आहे
'नेहरू सरकार, आहे धोक्यांत
'करा सहकार!
'तकवा धरा बकवा थांबवा!
'सर्कार आपुलें! आपुलें सर्कार
'विश्वास धरा!!...... '
अधून मधून
खुर्चीमधून प्रेरणा होतांच—
फडफडतांच दुबळ्या टाळ्या;
उनाड पोरें मारित खडे—
पुढिलांच्या डोईं,

आणि इतर वयस्क श्रोते—

दिसती समस्त अंतरांत स्वस्थ
टाकून आपला भरिभार सारा—
खुदाचे खांदा;
अपुलें काम, अपुला धंदा!—
तोच तथा भारी!.........

आणि, उभ्या उभ्या क्षण थांबुन
सभेचा रागरंग पाहून,
लौटत घरा—
बिचारे टांगले जीव संसारीं.

'सखये अमुचें जीवन' या कवितेंत विनोद, उपहास आणि कारुण्य यांचा सुंदर मिलाफ साधला आहे. गरीब जोडप्याचें जीवन म्हणजे जणूं लोकल गाडीचें स्टेशन. तेथें—

एक्प्रेस आणि मेल अम्हाला
अलभ्य, जैशा ऊर्वशि-रंभा!
मडमापरी कुणि सिगार फुंकित
तोऱ्यांतच जायच्या पुढोनी
निसटायाच्या तशा सफाइंत
दुज्या सुन्दरी चपला इथुनी

आणि—

रखडगाडि ती अपुल्यासाठीं
जाइल टेंकित टेंकित वाट
झुंबड-गर्दी यांतच दिसते
लिहिली अमुची संगत सोबत
बिजल्यांसम त्या अंगावरुनी
सुवर्णसंधि उडत जायच्या
येथुन आम्हां कधीं न सखये
या जन्मीं जणुं लाभायाच्या!

'परीट धुण्यावर—' आणि 'घरास अपुलें असावें देवघर' या कवितांतूनहि उपहास आणि तत्त्वचिंतन यांचा सुरेख मेळ घातलेला आढळतो. 'या निशा—' या छोटेखानी कवनांत कवि 'या निशा सर्व भूतानां तस्यां जागर्ति संयमी' या गीतेंतील श्लोकावर गंभीरपणें चिंतन करीत असतां खोलींत वरच्या बाजूस—

भिंतीवरी समोरील अंधारा कोन साधुन
दिसलीं वाघुळें ठेलीं योगनिद्रेंत टांगुन

तें पाहून कवि उद्गारतो—

संगती लावुं ये कैसी? कासया व्यर्थ शोधन?
चमत्कृति सुखानंदीं घटना देउं सोडून.

'त्र्यंबक भटजी' या कवितेलाहि विनोदाची झालर लावलेली दिसली तरी त्यांत व्यक्त झालेला भटजींच्या जीवनांतील भकासपणा मनाला टोंचल्याशिवाय रहात नाहीं. भर दुपारीं रखरखीत उन्हांतून भटजी घाईघाईनें जात असलेले पाहून पत्नीसहवर्तमान जात असलेला त्यांचा एकवेळचा शाळूसोबती, त्यांना त्यांच्या धांदलीचें कारण विचारतो. भटजी सांगतात—

'नित्याच्याच उपाधी पाठीं
'पोट लागलें पाठिस नच का?
'खविस पेन्शनर टोंकावरचा—
'घड्याळ लावुनि असेल बसला!
'आहों दम्पति!

भटजींचें कुटुंब मागून हळुहळू येत असतें म्हणून ते जरा थांबतात तोंच त्यांच्या आतां सुटाबुटांत असलेल्या त्या वर्गमित्राची विनोदबुद्धि जागृत होते आणि तो म्हणतो—

'का रे त्र्यंबक?
'नेस कुठें हें खांद्यावरुनी ताजें पपनस?'

पतिपत्नीमध्यें खसखस पिकते व भटजी खजील होतात व ते आपल्या डोक्यावरून हात फिरवितात. प्रसंग साधाच पण भटजींच्या डोक्यांत विचारांचें काहूर उठतें. काय कालगति आहे पहा! एका काळचा हा आपला शाळूसोबती आपल्या पत्नीसह आतां मोठ्या दिमाखांत जात आहे! अन् आपली स्थिति—

कठिण, ढांसळल्या श्रद्धांवर आधारलेलें अपुलें जीवन
चढतें जीवनमान प्रतिक्षण
ढळतां जनिंचा धर्मभाव अन्
संसाराचा प्रतिवार्षिक वाढता पसारा
पंचाइत प्रासीची......... '

भटजींना आपल्या जीवनांतील पोकळीची या अकल्पित प्रसंगानें जाणीव होऊन ते व्यथित होतात व वाचकालाहि त्यांच्याविषयीं सहानुभूति वाटूं लागते.

वरील परिच्छेदांत उल्लेखिलेल्या कविता वाचल्या म्हणजे कवीच्या प्रतिभेला वर्तमानकालीन विचित्र जीवनाचें नवीन दर्शन झालेलें दिसतें. तिला एक प्रकारची धार आल्याचा प्रत्यय येतो, व त्याचबरोबर त्याची प्रतिभा नवकाव्याकडे मंदगतीनें पण निश्चितपणें झुकत असलेली आढळून येते. रचना आणि अनुभूति यांमध्येहि स्पृहणीय स्थित्यंतर झालेलें दिसून येतें.

' नियति सुंदरी ', ' पंचगंगा ', ' मर्यादा ! मर्यादा ! ', ' परमेश्वर आहे ', ' अप्पाजी ', ' ग्रंथालयि मी जेव्हां जेव्हां जातों–', ' चम्पी ', ' एकच दांत ', ' अस्पताल ', ' रोज सकाळी सायंकाळीं ', ' विधवांचे विलाप ', ' रान कोंबडा ', ' शुक्रजन्तू ', पिंपळावरचें भूत ', ' परमेश्वर आहे ', या कविता नवकाव्याचें सुगम अन् मनोहर स्वरूप प्रकट करतात.

कोल्हापूरच्या पंचगंगेवरील हें दृश्य पहा—

पंचगंग नद संथ वाहतो ! ! हें झालें सृष्टींतील जीवन; पण
तिथेंच बाजूस तीरावरती स्मशानभूमी !
जीवन निकामी ठरलेले जीव—
जिथें पहुडती,
ओढुनि अपुल्या अंगावरतीं,—
नखशिखान्त ती राखी चादर,

तेथेंच जवळ शिलाखण्डावर बसलेल्या कवीला हें दृश्य पाहून शिसारी येते व तो विचारमग्न होऊन म्हणतो—

पांचांची तर सृष्टि सारी
देहाचें तर मडकें नश्वर
फुटायचें आहेच कधीं तरि;
असार जीवन माया केवळ
ब्रह्म सत्य ' अन् कांहीं यापरि

तोंच त्याच ठिकाणीं एक प्रेत वाहून कांहीं लोक येतात. तें अशुभ दर्शन टळावें म्हणून कवि आपली नजर दुसरीकडे वळवतो तों—

तिथें नदीच्या पात्रामध्यें—
तरुणी कोणी,—
वांकुनि मडकें भरीत होती;

आणि त्याच बाजूस जरा पलीकडे—

जवळच रुंद शिळेवर एका
धुवीत होती अवघड जाजम-
धरुनी चारी टोंकां;
रजक कुटुंबांतील तीं चौघें !.........
तेंच दृश्य मी बघत राहिलों.
किती निराळें त्या दुसऱ्याहुन !
इकडे मडकें, तिकडे मडकें !
इकडे चौघे, तिकडे चौघे !
परन्तु अन्तर त्यांत केवढें !

हें दृश्य पाहून कवीचें मन वेडें होतें आणि तो म्हणतो—

पंच नदाच्या कांठावरतीं
चौघांचा सहकार असा तो !
तसाच पूर्वीं, तसाच आतां;
अन् शेजारीं—
फुलवित जीवन, उभवित मधुवन
पंच गंग नद सन्थ वाहतो !

भर्तृहरीच्या ‘क्वचित् वीणावाद्यं क्वचिदपिच हाहेति रुदितं,’ या श्लोकांत जें जीवनदर्शन आपल्याला घडतें त्याचें हें आधुनिक स्वरूप कवीनें किती नव्या अनुभूतीनें या काव्यांत प्रकट केलें आहे !

निसर्गाच्या तडाख्यांत सांपडलेल्या ‘चंपी’ कुत्रीचें कवीनें काढलेलें चित्र सृष्टींतील गूढ नियतिक्रमाचें असेंच विदारक दर्शन घडवितें. आणि निसर्गाच्या इस्पितळांतून मानव-निर्मित ‘अस्पतालांत’ शिरलें म्हणजे तरी तेथें काय आढळतें ?—

‘अस्पताल ! अस्पताल !
मृत्यूच्या छायेंतिल
विकल-गात्र प्राण्यांची-
जीवनार्थं हालचाल

तेथील भयाण शांततेंत ‘मृत्यूचे द्वंद्वकार’ जे डॉक्टर त्यांच्या पायांतले बूट बेगुमानपणें ठक् ठक् आवाज करीत चालले आहेत. अन्—

निर्विकार, यंत्र सदृश
शुभ्रवेश परिचरगण
कळसूत्री बाहुल्याच
त्या, सहानुभूतिशून्य !
मूर्त योग गीतेतिल ? !

हें सर्व दृश्य पाहून असेंच वाटूं लागतें कीं—

काळाचे द्वंद्वकार
इथें स्वतः होत काळ;
यमपुरिच्या भीतीहुन
यातना इथेंच घोर
अनघांचे कारा-घर
अस्पताल ! अस्पताल !

हा कवितासंग्रह वाचून पाहिला म्हणजे कवीच्या प्रतिभेचा विकास आणि विलास कसकसा होत गेला आहे त्याची कल्पना करितां येते. कवीची कवित्वशक्ति हठाकृष्ट नसून ती स्वाभाविक आणि वर्धिष्णु आहे याचें प्रत्यन्तर सर्वत्र येतें. निसर्गांतील सर्व परिचित दृश्यें आणि राजकीय

आन्दोलनाचे पडसाद हे त्याच्या दृष्टींत येणारे पहिले विषय असावेत असें वाटतें. तेथून त्याची नजर सृष्टींतील वैचित्र्याकडे व सौन्दर्याकडे वळते; पण अजून त्याची शब्दरचना व कल्पनेचा विस्तार पारंपरिक व रूढ संकेतापलीकडे गेलेला दिसत नाहीं; तथापि त्यांतहि मधून मधून नवीन अनुभूतीचा प्रत्यय आल्याचा भास होतो. यानंतर त्याचें मन संसाराकडे वळलेलें दिसतें. प्रेमसुलभ भावनांनीं त्याचें अंतःकरण भरून आल्यासारखें वाटतें; परन्तु त्यांतहि भावनांची विविधता जाणवते. संसारांतील नाना तऱ्हेचीं दृश्यें त्याला दिसूं लागतात. आईबाप, मुलें आणि त्यांच्या अनुषंगानें जीवनपथावर धडपडणारी लहानमोठीं माणसें या संसार-संग्रामांत कशीं सांपडलीं आहेत यांचा वेध घेण्याचा कवि प्रयत्न करतो. सांसारिक सुखदुःखांच्या जाणिवेनें त्याचे मन अंतर्मुख झालेलें दिसतें आणि सृष्टीकडेहि तें त्याच भूमिकेवरून पाहूं लागतें. आतां त्याला जीवनांतील गूढें उकलण्याची ताकद येते आणि त्याबरोबरच विरोधात्मक उपहासाकडेहि त्याची प्रवृत्ति झालेली दिसते. त्याच्या नवकाव्याचा उगमहि येथूनच झालेला दिसतो; आणि त्याचा झपाट्यानें विकास होत असल्याचाहि प्रत्यय आल्यावांचून रहात नाहीं. विशेष आनन्दाची गोष्ट म्हणजे एखाद्या कवीचें किंवा काव्यप्रकाराचें निव्वळ अनुकरण केलेलें सहसा कोठेंहि आढळत नाहीं. दुसरी नवलाची गोष्ट म्हणजे केवळ शब्दांच्या नादाला तो केव्हांहि भुललेला दिसत नाहीं. मनातील आशय योग्य शब्दांनीं व्यक्त करण्याकडेच त्याची प्रवृत्ति दिसते. रचनेंतील रेखीवपणा आणि शब्दपंक्तींची अन्वर्थकता यांचा उत्तरोत्तर स्पृहणीय विकास झालेला आढळतो. त्याच्या प्रतिभेनें हा जो सर्वांगीण विकास दर्शविला आहे त्यावरून कवीकडे वाचक यापुढें अधिकाधिक अपेक्षेनें पाहू लागतील याविषयीं मला संदेह वाटत नाहीं.

शिवाजी पार्क, दादर
८ जानेवारी १९५५.

वि. ह. कुलकर्णी

# अनुक्रमणिका

## कांहीं संग्राह्य पुस्तकें

# क्रान्तिवीरांस वन्दन

वधस्तंभ हीं व्यासपीठें जयांचीं
स्रवद् रक्तबिंदू तसे क्रान्तिवाची
जयां भीववी ना कधी घोर कारा
नमस्कार माझा तयां क्रान्तिवीरां

असे देह मृण्मात्र आत्मा अमर्त्य
जयांची कृती घोपि हें थोर सत्य
जयांनी मृती मानिली धर्मदारा
नमस्कार माझा तयां क्रान्तिवीरां

जयांचीं प्रसन्न स्मितें उत्पलेंच
अलंकारिती मृत्युचे पाश नीच
जयां देखुनी पाप कांपे थरारा
नमस्कार माझा तयां क्रान्तिवीरां

श्ववृत्ती तशी भीरुता हीं जयांनीं
तिरस्कारिलीं घोर पापें गणोनी
सदा हाणिती पापशीर्षीं प्रहारां
नमस्कार माझा तयां क्रान्तिवीरां

तिरस्कारिती भीरु, निन्दीति आप्त
कुणी लेखिती ‘ मूर्ख ’, धिक्कारितात
जयां एकली कूस भूची निवारा
नमस्कार माझा तयां क्रान्तिवीरां

फेब्रुअरी १९४७

# नच पूर्वीं, नच नंतर

दक्षिणसागरिं कावडि भरूनी,
तें जल पावन!
नगाधिराज शिरावरि अभिषेकाया
व्योमपथाचे हे वारकरी दक्षिणवारे-
नैऋत्येहुनि उत्तरेकडे निघती जाया
अन् वाटेवरि,
डुचमळुनीया त्यांच्या घागरि,
मंगल स्नान धरित्रिस घडतें
तया क्षणाचीं, आनंदाची ती अनुभूती
नच पूर्वीं, नच नंतर!
तया सुमंगल स्नानीं
न्हाणवलीच्या अंगावरचें सुगंध लेपन—
दरवळून राहते हवेमधिं
करिती दर्दुर मंगल मंत्रांचें उच्चारण!
झाडां झुडपां मधुनी
सहस्र उन्मेषांनीं आपुल्या
रचित काजवे मोहक रोशन!
तया क्षणाची, आनंदाची ती अनुभूती
नच पूर्वीं, नच नंतर!
वरुणराज मग,
नव्या दमाचा नव्या रंगेचा!
धरितो दृढ खेवेंत धरित्री
आणि ओतितो तिचिया गात्रीं
नव-जीवन-कण!
त्या पहिल्या खेवेंतिल
ती अनुभूती अन् तें स्पंदन!
नच पूर्वीं, नच नंतर!!

एप्रिल १९५०

# अवाञ्छितें

क्षणमोहाचीं हीं चिरफलितें
विषय-पंकजें अन् गृहकुमुदें
निसर्गगृहिंचे सूड मनोहर !
नरयत्नांची फजीत सुंदर !
स्त्रीजीवन-नवबंधन-हेतु
तज्जीवन साफल्य परन्तु
कुटुंब-प्रेमा धनि आगंतुक !
स्वयमभिषिक्त घराचे शासक
विधातयाचीं रम्य कौतुकें
अवाञ्छित सुखें !
गोड बालकें ! गोड बालकें !

मार्च १९५०

# रानकोंबडा

खरखरलेलीं उन्हें भोंवतीं
रहदारी अन् विरळ जहाली
चिद्पाखरुं नच फिरके इकडे
मी तों पडवीमाजों पहुडें;
धारा वाहति;
लव नच वारा
किंवा वाटे तोहि पहुडला विश्रान्तिस्तव
उशास घेउन डोंगर आणिक तळिं अंथरुनी खोरें
अधुनमधुन अन् कुशीं वळुनियां दे सुस्कारे

देहाची तर होई लाही
वाचवे न वा लिहवे कांहीं
जीव तगमगे; तनू वळवळे !
तोंच जादुची फिरली कांडी
वैराणांतुन फुलवित वेली;
पल्याड डोंगर तळास खोरीं—
ज्यांत घन लताकुंज दाटले
त्यांतुनि बोले रानकोंबडा, घुमवित खोरें
मंद्र स्वर गंभीर तयाचा

ओति मधुर शीतताच कानीं
ओंजळींत जशि पिपासिताच्या—
ताजी घागर ओतावी कुणिं
रानकोंबडा ! कुणीं पाहिला ?
हुंकृतिवरुनी परिचित केवल
जवळ जाउनी न्याहाळावा
विचार हा नच मनास शिवला
वर्डस्वर्थ् नच मी, तोहि न कोकिल
रानकोंबडा केवल !

त्याच स्वराचा परिचय मजला बाल्यापासुन
आकर्षण मज सदाच त्याचें असें वाटलें
शिवाय, परिचय कशास बोला ?
गुणपरिचय हा परिचय सुंदर !
यास्तव, कधिं नच आतुरलें मन
कधिं न म्हणालों 'पाहूं जाउन रानकोंबडा'.
परिचय त्याचा हवा कशाला ?
मला विचारा !
रानकोंबडा —
वैराणांतुन वेल फुलविता
आगीमाजीं राग अळविता
रानकोंबडा,
नव्हे ! सृष्टिचा जादुगर बडा !

एप्रिल १९५०

# ऑगस्ट १९४२

निःशस्त्र, प्रबल परि हिन्दचमू ठाकली
सेनानि महात्मा, वृद्ध, नवल भूतलीं !
मायभू उभी संकटीं
चहुं दिशा भयें थरकती
भू, गगन, जल, तिन्ही प्रलयानें ग्रासिलीं.
'उखडल्या दास्य-शृंखला
ना गुमान याची मला '
ही वृत्ति चमूच्या नसानसीं बहरली.
विश्वास आत्मबलि महा
नच तमा जगाची पहा
राष्ट्रभारवहना वृद्धमूर्ति ठाकली.
जग वर्षो निंदा, स्तुति
'स्वोद्धार स्वकरिं ' ही मति
या धैर्यमेरुपदिं सहज जुळे अंजली !
'पदतळीं दुभंगो धरा
आभाळ कोसळो शिरा ! '
दृढ कोण पवित्रा ! वीरवृत्ति रंगली !
सेनानि महात्मा वृद्ध, नवल भूतलीं

ऑगस्ट १९४२

# वड

वडाचें झाड ! वडाचें झाड !
केवढा बुंधा ! केवढी वाढ ! ॥
गुम्फुनी मुळें, अंगाभोंवतीं
कुटुंबापरी एका थाटती
त्यांतून होय केवढें काण्ड ॥ वडाचें०

शाखा विस्तार, उंच आभाळीं
पारंबी तरी, ओथंबे खालीं
जन्मभूमीकडे, केवढी ओढ ! ॥ वडाचें०

आणि भोंवतीं, गांव वसलें
एका काळीं जें गजबजलें
आज परंतू, कोठें वसती ?
शहरांतूनी झाली भरती !
घराघरांत म्हातारी कोठें
दारापुढतीं वात सारिते
राखीत उभें गांव उजाड ॥ वडाचें०

कधीं एकादी दिसे तरुणी
प्रदक्षिणांत गेली रंगूनी
पाहुनी, डोळे येती भरूनी
हुरहुर आणि राहे लागूनी
ध्वस्त जीवनाची देत कीं याद ! ॥ वडाचें०

जून १९५०

## खेड्याकडे

शहरांतिल बहुरूपी जीवन
रंग बदलितें कसें क्षणोक्षण
भावांच्या चढ-उतारांवरी
असहायपणें राही टांगुन
तिथें ' काल 'ची कबर बांधुनी
' आज ' महल वरि रचितो नूतन
धांव तेथली भोवळ आणी,
श्रद्धा पडते ढांसळून अन्

जीव उबगला, ओढ घेतसे
येई खेडेगांवा धांवुन
तेथिल स्थिरता तेथिल शान्ति
अनुभवुनीया टवटवतें मन
गांव-शिवेपासून लागती
परिचित दृश्यें तीच दिसाया
ओठ लागती फुरुफुरुनी मग
गीत पायतालावरि गाया
त्याच टेकड्या, तेच कातळहि
पऱ्ये नि ओहळ तेच पूर्वींचे
झाड पेडही तेंच तिथेंची
हेंहि गमतसे बहुत सुखाचें
शेतमळ्यांतुनि वावरणारे
गांवकऱ्यांचे तेच मुखवटे
तिरपे त्यांचें दर्शन होतां
चित्त साहजिक सौख्यें दाटे
पडव्यांमधुनी खोकत खोकत
पूस-तास हे जरठ करीती

कुशल विचारुनि गद्गद कंठें
'चिठी न वरुनी अजुनी' म्हणती
वाटेवरि अन् उतरुनि वृद्धा
पुसत थांबवुनि कुटुम्बवार्ता
'किती धाकटीं' या वरुनी ज्या
अजमावित जीवन-यशस्विता

आणि घरीं पाऊल ठेवितां
गमे होतसे पुनरुज्जीवन
तें घर, परसूं-परडें पाहुन
तसेंच दारींचें वृंदावन

जून १९५०

# मर्यादा ! मर्यादा !

मला वाटतें कधीं हंसावें खदखदून,
हो खदखदून !

मला वाटतें कधीं रडावें ढळढळून
हो ढळढळून !

कधीं वाटतें नृत्य करावें, तिरकिट् तिरकिट् धा
तिर्‌किट् धा !

कधीं पडावें वाटे, बनुनी मुर्दा,
नुसता मुर्दा ! !

कधीं वाटतें गावें खोलुनी गळा,
मोकळा गळा !

कधीं बसावें गमे शान्त वेगळा—
जगावेगळा !

परन्तु भवतीं कोण तरी ही गर्दी !
जमते जीवा गोष्ट न ही ही साधी
स्वस्थ बैसतां, ‘ स्वस्थ कां असे ? ’
खुषींत येतां, ‘ जडे कां पिसें ? ’

सहस्र डोळे रिकाम टवळे करिती पाळत सोडुन धंदा
इकडे तिकडे, अवतीं भवतीं, मर्यादा ! मर्यादा !

जून १९५०

# माड—

रेताड मरुभूमाजीं कंठुनी खर जीवित
आचरीत जटाधारी यति कीं तप संतत
नभास भिडुं हा पाहे मनीषा तरि केव्हढी!
कांक्षा कोंकण-पुत्रांची प्रतीकें दाविते उडी
सडपातळ यष्टी ही सौंदर्य शिरिचें नव
तयाच कष्टशीलाचें दाविती मतिगौरव
वारा-पाउस जोराचा, रविचा ताप साहुनी
झुंजार वृत्ति हा दावी जीवन-प्रीत कोंकणी
अखंड फलसंभारें स्वामीसि निज पोसुनी
काय कल्पतरू दावी स्वामिभक्तिच कोंकणी
कठीण कवचीमाजीं अमृतोपमसें जळ
जणुं कोंकण-पुत्रांचें सुचवी मन निर्मळ
दावितो कोंकणी बाणा जीवत् जणुं प्रतीक हा
साक्ष यच्चरिता राहे इतिहास उभा पहा!

ऑगस्ट १९४५

# राया गुपित आपुलं—

राया गुपित आपुलें नको बोलूं कोणापाशीं
शब्द एक जातां वांया फांस लागेल गळ्यासी
न्याय जगाचा आंधळा निष्पापांचें रे दळण
नीच श्वान आणि करी सुखें यथेष्ट भोजन
माझ्या संसार-स्वप्नांची ज्यानें केली सारी माति
त्याच्या नांवें मिरविणें हें मंगलसूत्र कंठीं
ज्याच्या स्पर्शनेंच निघे रोमारोमांत शिसारी
त्याच्या वासनांतें देणें करूं तांडव शरीरीं
कन्या धन परकीय दान पितयानें केलें
पुढें आल्या धन्यामागें गाय अगतिक चाले
नांदली सुखानें, भलें ! गांजणूक जरी चाले—
दुरावल्या पित्या तरी नाहीं कान; नाहीं डोळे!
जेथें पिता दुरावला तीस कोठुन आसरा
परक्याची दारा, तीस कोणीं कैसा द्यावा थारा?
न्यायाच्या आश्रयाखालीं अन्याय उजळ चाले
पूर्ण अनुभूती अंतीं हेंच जगा कळों आलें
पाप वा अन्याय, सारे प्रकाशीच जन्मतात
पांघरुण अंधेराचे विश्व घालितें पोटांत
तुझ्या चोरट्या प्रीतीची मज सारी सारी आस
गुपित उघडशील ! करिशील सत्यानाश !

ऑगस्ट १९४१

## रातराणीस—

वायुवीचिवर तरल तरंगत अशीच, मधुगंधिनी
ये गडे उधळित तव मोहिनी

ही हिरवळ मउ मउ शेज रचित खालतीं
ताणिली तीवरी तनू मजा काय ती!
निथळते चंद्रिका ओसंडुनि भोंवतीं
नक्षत्र-सुम-परागचि कीं उधळित कुणी!

देदिप्यमान गुरु झळाळतो अंबरीं
ही चंद्रकोर चिमुकलीच शोभे दुरी
लुकलुकती चांदण्या चंचल-दृक् किति तरी
स्फटिकशुभ्र नभ! मन जाई वेडावुनी!

तो भूत बुडाला विस्मृति-डोहीं पहा
वर्तमान रमला सुखसंवेदनिं अहा
मज नुरली आतां किमपी अन्य स्पृहा
तव आलिंगनिं पंचत्वीं लय मनोज्ञ व्हावा झणीं
एवढी आस मनीं या क्षणीं!

एप्रिल १९४१

# जेथें भव्य हिमाद्रि

जेथें भव्य हिमाद्रि उत्तर-पथीं प्राकार स्वांगें करी
जेथें पश्चिम, पूर्व, दक्षिण दिशा रक्षीयल्या सागरीं
तेथें भारतभूमि हाय तुजला हें दास्य ये दुर्धर
झाले अन् परदास्यरक्षकच हे पूर्वील स्वत्किंकर !
आपत्कालिं सदाच आप्त फिरती, तैसेंच का हें म्हणूं ?
हिंदीसागर, हा हिमालय, तयां का मी फितूरीं गणूं ?
सेवावृत्तिसवें स्वकीय मनही जेत्यांपदीं वाहुनी
कारा-रक्षण हे करीति, असतां स्वस्वामिनी बंदिनी
निंदूं मी तरि कां तयांस म्हणुनी ? स्वातंत्र्य का राहतें—
प्राकारीं ? तटबंदि अश्मघटिता देशास का रक्षिते
स्वार्थे झिंगुनिया विवेक अपुली जें गस्त घालूं निघे
तें वेषांतर साधुनी कुटिल हें दास्य स्वदेशीं रिघे
जेव्हां येइल राष्ट्रधर्म उदया सारील दूरी तम
तेव्हां तस्कर हा पळेल इथुनी पावोनियां संभ्रम

ऑक्टोबर १९३९

# शुक्रजन्तु

यःकश्चित् हा कीटक!
क्षुद्र! क्षुद्रतम जन्तू;
किती परंतू अवखळ!
केवढि याची वळवळ!
पुच्छांतच याचें बळ सारें!
बिंदुमात्रिं वसतो शतभारें
हिटलर, मुसलिनि, चर्चिल, स्टॅलिन्
गांधी, रूझवेल्टादी युगपुरुषांचा जनिता
अनाद्यनन्ताशीं नित याची टक्कर!

यःकश्चित् हा कीटक
क्षुद्र, क्षुद्रतम जन्तू!
लंपट किती परन्तू!
संधिसाधु मुलुखाचा,
वाट काढु दुनियेचा
सामान्य विषें न मरे
मरतां मरतां प्रलय केव्हढा मांडी!
शीतोष्णांतुनि तरतो
शत्रु तयाचा हरतो
जिवट चिवट हा परंतु उरतो
वंशपटाचा विणकर;
बसतो अंधारांत आपुली करित करामत!

यःकश्चित् हा कीटक
क्षुद्र क्षुद्रतम जन्तू,
लंपट स्वतः असुनी,
नीति-कल्पनारक्षक मोठा!

दक्ष रात्रंदिन,
व्यभिचाराचें करितो स्फोटन !
पक्षपाति पण हा मुलुखाचा,
स्त्रीजातीचा दुश्मन् !
( की स्त्रीविकसनकर्ता ?
ठरवा आपुल्या चित्ता ! )
वदा न किन्तू—
'क्षुद्र, क्षुद्र हा जन्तू !'

ऑक्टोबर १९५०

# सलून खेडेगांवामधलें

सलून खेडेगांवामधलें
जुन्या जगांतिल नव्या युगाचें — ठाशिव पाउल
पंचक्रोशीमधल्या वार्ता—
संकलणारी प्रसारणारी — लोकल स्टर
इथें टांगला करिल 'महात्मा'
कर्तनेच्छुचें आगत-स्वागत — हंसूंनिया मंद
अन् 'नेताजी' लगोलग तथा
देतिल ती सैनिकी सलामी — वदूनि 'जयहिंद'
अन् कारागिर करील जोंवर
सप् सप् साफसफाई खालीं — डोईवरली
वरुनी 'भारतभाग्यविधाता'
तावुनि तावुनि उडविल अहगळ — डोइआंतली
क्वचित् लेटुनी गाईपाठीं
असेल तिष्ठत बाजुस कोठें — श्री दत्तगुरू
असेल तैसा महादेवही
संतत उडता स्प्रे शिरिं धरनी — सेवातत्परू
नव्याजुन्यांचा निजा परांचा
संगम ऐसा पहाल कोठें? — बोला बोला
बेमालुम हा संस्कृतिसंगम
देइल दर्शन येथ मनोरम, — उघडा डोळा!

एप्रिल १९५१

# स्वातंत्र्य-लक्ष्मी तिथें नांदते

स्वातंत्र्यगीतें जिथें गाउनी
माता मुलां अंकिं आंदोळिती
आझादिचा मूक संदेश अन्
जीवीं नव्या गर्भिणी प्रेरिती
स्वातंत्र्य-नेतेच होती जिथें
बालांचिया मानसांचे सखे
स्वातंत्र्यलक्ष्मीहि देशा तया
घालील कां माळ ना कौतुकें ?

पाशीं मृतीच्या युवा गुंतला
बुध्द्या वरी नार त्यातें तरी
मानी सपत्नी जिवाची सखी
निर्मत्सरा कामिनी अंतरीं
अंतःपटीं बंदिचा पंजर
अन् अश्रुमाला विवाहा जिथें
वैधव्य, सौभाग्य जेथें गमे
स्वातंत्र्य-देवी तिथें नांदते

स्वातंत्र्य-युद्धीं शवा बंधुच्या
माथां उशीचेपरी घेउनी
जेथें सुखें घोरती सैनिक
खेळून संग्राम रात्रंदिनीं
जेथें पदक्षालना प्रत्यहीं
देखे नवे शोणिताचे घडे
स्वातंत्र्यलक्ष्मी तिथें नांदुनी
तत्काल दूरी करी सांकडे

१९४६

# अनयाच्या राज्यीं

अनयाच्या राज्यीं कसे भिंतीलाहि कान
अंधेराहि येइ लाख नयनांचें त्राण
होई वारा अनयाचा बांधला गुलाम
थुंक झेली त्याची करी चुगलीचें काम
अनयाच्या घरीं वांसोळयाहि फिरती
उभ्या पायांखालीं कशी भंगे धरती
अनयाच्या राज्यीं उंचावली मान ताठ
देखुनियां मत्सराचे डोळे जळतात
पिळतात मान तेथें आपुलेच हात
अनयाचे पाय लाळया जिभा चाटतात
आंतडींहि घेऊं जाती हृदयाचा घांस
लाथाडिती माथा पाय जुलुमाचे दास
अनयाचे राज्यीं जिणें सदाचें अनाथ
प्रतिक्षण विनाशाचे पाय वाजतात

## प्राजक्तावर

निळसर आभाळामधुनी भूवरि हिरव्या गार्
वर्षर्तू फेकित होता शीतल वारि तुषार्
किरण कोवळे सूर्यांचे होते करित विहार्
त्यांत दिसति जलबिन्दु जणूं मोत्यें पाणीदार्
दूरवरी इन्द्रधनूची शोभे भव्य कमान्
क्षितिजावरि पूर्व प्रान्तीं कल्पित तोरण छान्
झुळूक वायुची शीतलशी त्यांतचि मधुनि वहात्
डुलवित होती माडांची हिरवी पिवळी पात्
फुलल्या फांदीवर एका प्राजक्ताच्या सान्
जोडा सुन्दर चिमण्यांचा बसला होता छान्
घालुनि चोंचीमध्यें चोच् बिलगति दोघे जीव्
नन्दनवनिं सुख लुटति जणूं अत्रप आदम ईव्ह्
परस्परांचे पंख-पुटीं आलिंगित तीं अंग्
हेतू कीं, नच कधिं होवो प्रणय समाधी-भंग्
न्याहाळित मी उभा, तयां नच याचें अवधान्
नव्हतें दांभिक लज्जेला हृदयीं त्यांच्या स्थान्
दृश्य बघुनि तें गोड तदा येइ विचार मनांत्
नरजन्मीं नच मिळणें हा स्वातंत्र्याचा स्वाद्
प्रभो जरी किंचित् पुण्यांश असेल मत्कर्मांत्
पुनर्जन्म अन् जरि देणें तुज दे विहग कुलांत्
त्या प्राजक्ताची फुलली दुसरी फांदी छान्
लववित बसुनी मी ऐसा दयितेसह रममाण्

१९३८

# सौभाग्यकांक्षिणी

माहेरवासिनी माय घरा पातल्या
कुणि माता भावी, कुणि माता जाहल्या
उल्हास ये घरीं दारीं बहरुनि पण
मज जीवन येथिल आग जणूं वाटते
सोडुनी जग गमे जावें रानी कुठें

मम बाल मैत्रिणी करिति सहज चौकशी
कुणि मुलां शिकविती मजसि म्हणूं ' मावशी '
मज वीट बघुनि ये सारीं शिशु-चेष्टितें
ही चिन्ता जाळी मन्मानस निशिदिनीं
स्त्रीसुलभ भावना जाति गमे आटुनी

मज सख्या प्रेमला मज घरिं बोलाविती
परि सुखें तयांचीं गमे मजसि हिणविती
स्थान ना मज तिथें गमे सतत राहुनी
उल्हासवृष्टि करि उदास मन व्याकुळ
एकलेपण करी चित्ताची तळमळ

दाविती कुणी आंतर स्नेह-भावना
मम कीव करिति तीं सकल गमे मन्मना
मी विषय दयेचा स्नेहिजनां जाहलें
करुं वाटे शेवट, वदते आशा पण
' जाईल तीव्र का निदाघ वृष्टीविण ? '

तें गोड वदति जन, गोड जया शेवट
कण्ठणें याच आशेनें कटु जीवित
घडणार ते घडो भेट जिवाची शिवा
ही धीरें पूजिल देवी गौरी-हर
आशेची ओढित मणिमाला तोंवर

जून १९४५

# म्हाताऱ्या

माध्यान्हीच प्रखर ऊन सम्पून कुठेशी नुकती
झुळुक वायुची शीतल मधुनी वाहुं लागली होती
त्या झुळुकेसरशींच दूरच्या सावरिची फुललेली
रेशिमरंगीं बोंडें सुटुनी चहूं दिशांनीं भरलीं
आणि सानुलीं मुलें धराया तरंगत्या म्हाताऱ्या
नाचत नाचत अंगणांतुनी घालिति मागुनि फेऱ्या
म्हाताऱ्यांनीं मुलां खेळवुनि त्यांचे लाड करावे
आणि मुलांनीं म्हाताऱ्यांच्या भंवतीं गोळा व्हावें
युक्तच हें, परि हवेंत पाहुनि म्हाताऱ्या उडतांना
खेद वाटतो म्हाताऱ्यांची अमुच्या पाहुनि दैना
या म्हाताऱ्या हवेंमधेंही खुशाल झोके घेती
त्या म्हाताऱ्या संसारीं जड म्हणुनी लाथा खाती
या म्हाताऱ्या, त्या म्हाताऱ्या परन्तु अन्तर त्यांत
रुतती त्या संसारपंकिं, या विहरति आकाशांत

१९३७

## चंपी—

चंपी बिचारी!
बसते येऊन रोज दारांत
दुमडुनी पाय, टेकुनी पोट
डोळे करुनी किलकिलते
डुलक्या घेते.
पाठीचें आढें!
बरगड्यांचीहि पाखें तशींच
राहून राहून देत आठवण
जुनाट केमळी घरकुलाची
सांप्रत चंपीच्या जीवनाचा हा
कृष्णपक्ष आहे.
भिजून आपण कलेने एकेक
पोषित तेजाचे इवले गोलक
रंगते शर्वरी;
तशीच चंपी गरीब बिचारी
अनेक गोळे पोशीते आहे
पोटाची पखाल भुईवर कशी
लेटली पहा!
ओथंबलेले तींत आंचळ;
दिसते कशी भाकळलेली
निस्तेज कातडी, रोड शरीर!
तिच्या जीवनाचा कृष्ण पक्ष हा
तिच्या जीवनांत शुक्लपक्षहि
येईल, येईल!
श्रावण ओतील सरीवर सर
ओतील भूवरी हरित सौंदर्य
पहावया जें—
करितील दाटी गौरी गणपति
भाद्रपदांत;

उतरतील तेविं पितर
तयाच कालीं,
अनंत आकाशीं तरंगणारे
आतुर जीव
म्हणतील ‘ दे, दे, आम्हांस काया
सुंदर भूवरी बागडावया ’
तृप्तीचें दान याचीत, अवघे
फिरतील तिचे यार लाचार–
तिच्यामागून
कांहीं महिने तयामागुतां
माजत जाईल चंपीचें शरीर;
होईल ओटी लुठलुठीत;
भव्य महालाच्या तक्तपोशींतील
हंड्यांपरीस
दिसतील तिचे हेच आंचळ,
दिसेल चंपी तजेलदार !
आणि पुढतीं–
आजची गत व्हायची, रीत
आहेच ठरली !
चंपीचें पोट,
अवकाशांतून जीवन भरून
देहाच्या मळ्यांत संतत ओतती–
सजीव मोट !
उसंत केवळ मरणानंतर !
चंपी भासते गरीब हरिणी
शकुंतला तिला कोण भेटणार–
या जीवनांत ?
जीवन तियेचें केवळ कष्टाचें
त्यांतून तिला मुक्त करील–
कोण रघुनाथ ?

ऑगस्ट १९५०

## राष्ट्रदेवो भव !—

होता शोभत विश्वमंदिरिं महान् प्राचीन जें भारत
होतीं लोळत तत्पदीं सकल तीं स्वातंत्र्य-सौख्यें यदा
अंतःपूर्णतया प्रदेशिं अवघ्या ये पूर संपन्नदां
सौख्याचे भरदार सुंदर मळे होते इथें डोलत
होती वंशपरंपरागत सुखें लक्ष्मी गृहीं नांदत,
ऋद्धीसिद्धि जळा भरीत सदनीं होत्या अहोरात् यदा
होतें भासत आयु दीर्घ अपुरें भोगावया संपदा
आशीर्वाद ' चिरायु होइ ' युवका वाटे प्रसादांकित
गेलें वैभव आज सर्व विलया हो अन्नही दुर्मिळ
पूर्वींचा इतिहास आठवुनि हो हा खिन्न हिंदी युव
भोगाचे दिन संपले, विमुख हो लक्ष्मी अतां चंचल
त्यागाचा दिन संप्रतां उगवला हा कष्टकारी नव
आशीर्वाद ' चिरायु हो ' नच रुचे मातें अतां केवल
ठेवोनी कर या शिरीं म्हण गुरो कीं ' राष्ट्रदेवो भव.

१९२९

# पडतां काठी ढोलावर

पडतां काठी ढोलावर शिमग्याची
थंडि उडाली भयकंपित चित्तांत !
फणस कोंवळे अंग शहारे त्यांचें
धीट काज पण डोकवते जांभींत
दुमदुमती या दिशा जागती रात्रीं
नाचत खेळे घरोघरीं दिवसांत
कोशे अन् अंगरखे त्यांचे रंगी
पवनिं ताटवे तेविं झुलत नाचांत
सावरि फुलली लाल परंतु अपर्णा
बैरागिण जणुं युवती ऐन विशींत
चांफा आणि सुरंगी परिमलभारें
वेधिति पथिका पदोपदीं वाटेंत
सुगंधपुष्पीं मंडित केशकलापें
प्रियतर ललनागमनें होत सभांत
सूक्ष्म सुगंधें आंबेवन दमदमलें
पराग, मोहर तरुतळिं पडले दाट
चाहुल घ्यावी गोड वसंतपदांची–
त्यांतुन, दाह तदीय न अजुनी प्राप्त
जणुं प्रणयरम्यता विवाहपूर्व दिनांची
जों झळा दूरवर अजून संसाराची.

५-९-४९

# ती उफाड्यांतली पोर !

ती उफाड्यांतली पोर !
पाहिली न तोंवर वैराग्याचा जोर !

या मळल्या पाउल वाटेनें जाउनी
या शेतवाडिच्या पल्याड या हिंडुनी
अन् पोर पहा का ऐशी दिसते कुणी ?
मन उरलं मग जाग्यावर तर हे पोकळ अमुचे बोल !

उमर ना अधिक उणि सोळाहुन निश्चित
कळि अर्ध विकसली अनाघ्रात भासत
फुटतील पंख मधुपांचे कैसे द्रुत
सौगंध जरा दर्वळुं दे बहरुन अणिक ज्वानिचा जोर.

मुख सतेज अवयव सारे बांधेसुद
वर्धिष्णु स्तन करतिल तव कर उन्मद
प्राजक्त फुलांचे देठ ओठ तद्विध
स्फुरले न आपुले ओठ तरी जितकाम तुम्ही जन थोर.

नेसणें कसें नेटकें चापचोपुनी
जंघाद्वय दिसतें पुष्ट उठुन त्यांतुनी
राहतां उभि गमे फणा करी नागिणी
हरवाल पहा दिल्, म्हणाल वरतीं तिलाच मग मन-चोर.

आजानु वाढल्या पिवळ्या भातांतली
ती मोळीवाली वनिंची माशुक परी
तारुण्य निरामय मूर्त बघुनि भूतळीं
साशंक पौरुषीं निज व्हावा क्षण जवानही माजोर.

मार्च १९४२

# येउं कशी आंत

येउं कशी आंत, सख्या येउं कशी आंत्
ऊर हें धपापत, मी येउं कशी आंत्
आप्त गोत परिचित जन दूर बघोनी
चुकवित सकलांस वीथिकान्तर करूनी
आलें ही मदन-विवश तुझिया दारांत्
ऊर हें धपापत परि......

कातर मी हृदयीं, ही कातर वेळा
कुणि बघेल येथ अशी एकलि मजला
'काव काव' होइल अन् उदयिक गांवांत्
ऊर हें धपापत परि......

आलें तव दारीं परि होय न धीर
घुटमळलें सटकलें पुढेंच समोर
वळुनि पुढिल चौकांतुनि फिरूनी ये आंत्
ऊर हें धपापत परि......

घालुं किती परि अशाच कातर फेऱ्या
संशय तो मात्र व्यर्थ येइल साऱ्यां
कुठुनी निर्बंध तुझी मग मजसी गांठ्
ऊर हें धपापत परि......

क्षण क्षण ही जाय संधि सुन्दर वायां
आसमन्ति न कुणी परि धीर न पायां
व्याकुल मी काय करूं गोंधळ चित्तांत्
ऊर हें धपापत परि......

बघतें मी पहुडलास तेथ मंचकीं
मग्न वृत्ति, नेत्र स्थिर तेविं पुस्तकीं
लगत दीप, लोटिलेंच दार हें तशांत्
ऊर हें धपापत परि......

धडक आंत येउनि ही तनु थरारती
फेंकतेंच तर तुझिया बाहुसंपुटीं
करि करणें जें पुढें प्रभो तुझ्या मनांत्
पसर बाहु घे सजणा येतच मी आंत्

जून १९४१

# वृद्धेचा उपदेश

वदुं नये सये अपशब्द मुलांस अजाण
नच जयां घरीं त्यां दारीं कोठुनि मान ?
वाटेचा वाटसरूही
अवगणूं धजे त्या पाहीं
घेई न घरीं ज्या ममता सांभाळून,
तव अंगणिं फुललें फूल
मोगरि वा तगरि असेल
तूं चुरगळितां त्या लाथाडिल जग, जाण !
तूं म्हणशिल सहजच ' नंदी '
तेव्हढी पुरे परि नांदी
नटवील शेजि बघ तया ' म्हसोबा ' म्हणुन.
' कारटा ' म्हणे ज्या माता
जग ठरवी त्यास करंटा
म्हण ' बाळ ', परी ' बळवंत ' म्हणेल न कोण.
दगड जरी तुझिया पदरीं
करिं तुझ्याच जादूगारी
दगडांहि पोटिंच्या करी नर्मदा ' बाण ' !
जी माया वसते पोटीं
ती जरा दिसों द्या ओठीं
पाताळ-जळ न, वर्षांच वृक्षकां प्राण !

जून १९४५

# माघ वद्य नवमी

उलट मराठ्या इतिहासाचें पान् !

तिथें पहाशिल माघ वद्य तिथि नवमी स्वर्णाक्षरीं
याच दिनीं तो नृसिंह ‘ ताना ’ सर कोण्डाणा करी
गा रसने माझिया तयाचें गान्

पणा लागलें शील सतीचें घाला धर्मांवरी
मोल देउनी स्वप्राणांचें तान्हा रक्षण करी
तत्स्मृतिला करूं अश्रुजलांजलि दान्

लग्न लोटुनी दूर सुताचें समर-मंडपा निघे
पुत्रकल्प-गड-स्वातंत्र्यश्री-विवाह लावोनि घे
साक्ष ठेवुनी स्वदेह होम महान्

निज इतिहासाविषयीं मित्रा उदासीनता पुरे
अज्ञानें कां दवडिसि वायां चैतन्याचे झरे
पूर्व दिव्य, तर उभवूं भावि समान् !

राष्ट्राचा इतिहास निर्मिणें अम्हीच, निर्मूं कसा ?
सुवर्ण-पाया रचिला, मन्दिर घडेल कवण्या दिसां ?
भास्वत् हा इतिहास हिऱ्यांची खाण्

जानेवारी १९४२

## ती येईल

‘ ती येइल, येइल, येइल रे
उरीं तुम्हा धरिल मग हर्षभरें ’ ॥ ध्रु० ॥
प्रेमळ भोळा पति संसारीं
पडे चण्डिका चंचल पदरीं
जातां भांडुनि रागें दूरीं
मुलां म्हणे उसन्या धीरें ॥ १ ॥
होय घर सुनें कुटुंबिनीविण
गमे उभा संसार बसे क्षण
टेक द्यावया झटे पती पण
आश्वासी रडतीं पोरें ॥ २ ॥
बघुनी दुबळया लेकरांकडे
सांभाळुनि घेतलें न थोडें
अखेर परि तडकलेंच भाण्डें
तथापि पति-मनिं आस उरे ॥ ३ ॥
वेणिफणी लेकींची करितो
धुतो अंगडीं अन् जोजवितो
खेळवितो भरवितो न्हाणितो
बळें धरितसे मुख हंसरें ॥ ४ ॥
घरीं कष्ट, बाहेर कष्ट करि
परंतु ठेवी दारें उघडीं
लाज झांकु पाहतो हरघडी
झुलवित आशेलीं बाळें ॥ ५ ॥
मूर्तिमंत कर्तव्य वांकलें
वत्सलतरु मरुदेशिं वा फुले
जळुनि स्वतः गृहदीप पाजळे
आस गाइ कीं धीर सुरें ॥ ६ ॥

एप्रिल १९४७

# मत

‘ अस्मिता ’ नि ‘ अनुभव ’ यांचे पोटीं
ये अपत्य जन्मा ‘ मत ’ ज्या वदती
नान्दती सुखे दम्पति संसारीं
तै अपत्य निपजे कुलीन भारी
स्त्री ठेवि मुठीत जई नर स्त्रैण
कां अपत्य होइल नच नादान ?
पर-पुरुषरता गृहिणी ती होतां
ये अपत्यास कोठुनि कुलवत्ता ?
अन् कूस बहुप्रसू या युवतीची
ठेविणें स्वपुरुषे पाळत ईंची
नच चंचल म्हणुनी इस टाकावी
संसार न चाले पुत्राभावीं
‘ अनुभव ’ संसारिं वरील विरक्ती
तरी दत्तक मत आप्त बळें देती.

१९४४

## अझीजान

गान-नर्तनांत जियेचें जीवनार्ध रमलें
ती रणरागिणि तूं जहालिस, धन्य तुझी बाले!
कमलदळीं अटके पूर्वं वयिं लोलुप जी भ्रमरी
फुलवी तीच दळें मागुतीं सत्तावन समरीं.
प्रथम नूपुरांनीं जियेच्या महाल दुमदुमले
खणखणलीं खड्गें पुढें परि तिथेंच त्या तालें.
मादक जीं नयनें युवजनां बेदिल करतात
त्यांतुनि क्रान्तीचे इषारे अमोघ निघतात!
पण्य अङ्गना जी नाचली द्रव्याच्या ताला
तिनेंच नाचविली चण्डिका कराल विक्राळा!
ज्वलत् क्रान्तिकुण्डीं प्रतिष्ठा, दंभ जधीं वितळे
मृत्कणिकांमधुनी पडे तें सुवर्ण रसरसलें.
जी लावण्यलता भासली विलोभनीय जगीं
ती होउनि विद्युत् क्षणार्धीं विचरे रणरंगीं
अझीजान बाला, म्हणो कुणि 'कामाची तलवार!'
क्रान्तिकालिं जेथें घेतसे शक्तीचा अवतार;
त्या भारतदेशा खेद कां? एक समर हरलें?
उगवायाचिं न का या पुढें सत्तावन सालें?

फेब्रुवारी १९४७

# पिंपळावरचें भूत

त्या पिंपळ पारावरी नाचते भूत कधीं थयथया
भेसूर अन् किती विकट करी हास्य तें
सळसळतां फांदी लवहि कसें बिथरतें
त्या जीर्ण तरूचें रक्षण करुं पाहतें
पथिकास दावि वाकुल्या ॥ १ ॥

डाहळी तरूची इवली खुडतां कुणी
मुरगळितें त्याची मानच हें तत्क्षणीं
विपरीत तयाची रीत अशी शासनीं
जणुं आधारचि हें नया ॥ २ ॥

परि पायीं दोन्ही पहा असे पांगळें
वर डोळां दोन्ही तैसें हें आंधळें
मुलुखाचें कुणि नच भ्याड असें देखिलें
हें भिववि भीरु जो तया ॥ ३ ॥

हें दिसे शरीरीं जणुं हीडिस अस्वल
व्याघ्राचें जरि दाढांत दिसे या बळ
तरि शशकापरि धडधडतें तें अन्तर
ढोलींत घेइ आश्रया ॥ ४ ॥

उतरेल जेधवां टोळधाड अवचित
वा वादळिं होइल पिंपळ उन्मूलित
हें हलेल येथुनि तेधवांच दुःखित
निज जीवित रक्षावया ॥ ५ ॥

१९४७

# मी परक्याची

मी परक्याची परक्याची
या जन्मि न तुझि व्हायाची!

जीवन माझें ठरलें, कळलें
तुझें व्हायचें आहे सगळें
मम दुर्भाग्यें मात्र विटाळे
तुझेंहि सौख्य उगाची, मी परक्याची!

मरु भू-गत जीवन-नद झाला
छाया शीतल कुठुनि तयाला?
तदाश्रया नर जो का आला
होइल आग तयाची, मी परक्याची!

दूर दूर या पुढें रहाणें
भग्न मनोरथ नित आठवणें
परस्परांस्तव अन् हुरहुरणें
हीच फलश्रुति याची, मी परक्याची!

जा, वर भार्या तुज साजेशी
ठेव रोवुनी प्रपंच-तरुसी
येइन धावत वेळविशेषीं
याचित छाया त्याची, मी परक्याची!

तुझीं अंगणें मोदें झाडिन
करीन दारीं सडासारवण
तुझीं बालकें तशीं खेळविन
वस्त्रें धुविनहि तुमचीं, मी परक्याची!

दाबुनि वडवानल पोटींचा
हसत सिन्धु का जसा सदांचा
बघुनि समागम विधुरोहिणिचा
वृत्ति धरीन तयाची, मी परक्याची!

सप्टेंबर १९४१

## उजळ न उजळ दिशा—

उजळ न उजळ दिशा,
सरलि न सरलि निशा;
धुक्यांतुनी सृष्टी
आकारलि नच तीं,
वारा थरथरतो
रहाट करकरतो
कोठें परसांत
कंदिल लुकलुकतो
रात्र-कीटकांच्या–
तंबोऱ्यावरतीं
देवघरें कोठें
भूपाळ्या गाती
आणिक दारींच्या
प्राजक्तावर धुंद्
पक्षी गोड वदे
'राजा गोपीऽचंद्'
त्या क्षणिंची निद्रा
    गुलाब-गंधा! गुलाबगंधा!
जागृति धुंद तशी
    स्वप्न-सुगंधा! स्वप्न-सुगंधा!

१९५१

## भारतीय विधवांचे विलाप

भारतीय वीरांनो
भिडतिल का कधींतरी
विधवांचे आर्तशब्द
आपुलिया जिव्हारीं ?

देवव्रत, सत्यसंध,
धर्मज्ञा हे भीष्मा,
अमुच्या पति-पुत्रांचें
रणिं कंदन जें घडलें
त्यांतिल दायित्व तुझें
वद वृद्धा केविं टळे ?

शब्दास्तव एक अब्द
झुंजविला त्वां भार्गव,
भूकबळी रोगबळी
असंख्याक देउनि तंव;
द्रौपदी-विटंबनींच
मिटुनि घेतलेस नेत्र
मूग गिळुनि बैसलास
स्वस्थ क्षणिं त्याच मात्र !

कुरुवृद्धा, कुरुवृद्धा
आर्तत्राणार्थ कां न—
उचलिलास धनुर्बाण ?

द्रौपदी, भली तूं जरि
होतिस तेव्हांच नग्न !
जळुन भस्मसात् बीज
टळतें रण भावि का न ?

परि, फोडुनि हंबरडे
दैन्य तदा दाविलेंस,
अन् अखेर साड्यांना
धिक् नारी भाळलीस!

अन् राण्या गोकुळिंच्या,
त्रिभुवनिंच्या वेऱ्हाऱ्या,
भक्तिधनास्तव तुंवाहि
गासंड्या मोकलिल्या
हरिदासां कीर्तनास
विषयमात्र पुरविलास!

स्थितप्रज्ञ धर्मराज,
आपण तर मेरुमणी
कुरवाळुनि चांडाळां
जे अजातशत्रु जनीं!
द्यूत दुष्ट शकुनीशीं
खेळलांत, झालां जित
बंधु-पत्नि पण्य करुनि
भिक्षापति जाहलांत
राज्य दुजें करुनि उभें
भावण्डें आपुलींच
लीलेनें बनविलींत
निर्वासित! निर्वासित!
भीमाचा तेजोवध
घडी घडी साधिलात,
जिष्णूतें बृहन्नडा
बनवुनियां सोडिलेंत,
काय फलित? काय फलित?
टळलें का युद्ध-सत्र?
अष्टादश अक्षौहिणि
नृवीर-बलिदान मात्र

धर्मात्मा गणे कुणी
कुणी सत्यसन्ध म्हणुनि
अन्य बिरुद लब्ध कुणा
कीर्ति होय तीन भुवनिं !
आन्तर्जगतामधल्या
दुमदुमत्या दुंदुभिचे
'मानव्यादर्श' म्हणुनि
होणाऱ्या घोषांचे
भेदुनिया भव्य नाद,
विधवांचे आर्तशब्द—
कर्णपथीं जातिल का ?
भारतीय वीरांनो
सत्य प्रिय होइल का

ऑगस्ट १९५२

# पोफळींच्या बनांत

आकाशाच्या छत्राखालीं खुपसुनि माथे, इथें
पूगितरूंचे थवे उभे हे किति निश्चल भोंवते!
दूर अन्तरावरी कुठें तरि श्वान बुभुक्कारितें
तयें निनादित वातावरणीं लहर मृदुलशी उठे
पिठासारखें शुभ्र चांदणें न्हाउं घालि भूतला
त्यांत पूगितरुकांडें पांढुर आकर्षिति दृष्टिला
इतर तरूंचीं हिरवीं पर्णें पिठुळ चंद्रिकेमधें
धवलीकृत निज वर्णें मोहक भारिति नयनां मुदें
जीर्ण पर्णही कुठें तरूचें पडतां गळुनी तळा
पाचाळ्यांतुनि सळसळ उठुनी चित्त वेधि त्या स्थळा
प्रदीर्घ छाया मधुनि केळिचीं पानें धरिती जिथें
प्रकाश-छाया-चित्रित भूमी नेत्रां आल्हादिते
उधळित सुषमा अमित करांनीं वरुनि चंद्रमा हंसे
सृष्टि होय सौंदर्यमुग्ध जणुं जडलें तिजला पिसें.

एप्रिल १९४२

# तूं नव्हेस माझी आई !

दुष्ट कसाई ! तूं नव्हेस माझी आई !
आई जर असतीस, तर अतां
दुसऱ्याच्या अपराधांसाठीं
मारतीस ना मलाच वरतीं
देव पाहोनी–घेईल तुझी ही करणी

मी न ' शहाणा ' ! ' मूर्ख ' म्हण मला
' वेडा ' असुं द्या मीच एकला
माझा जरि अपराधहि नसला
मार खाण्याला, मी काय तुझा गे ' छकुला ' ?

असतिल कोणी जे तव मुलगे
खुशाल त्यांना भर तूं रागें
' थोर ' ' शहाणे ' व्हाया सांगे
नको ते मजला, उपदेश तुझे ' मूर्खाला ' !

नको तुझा जा मजला खाऊ !
नकोहि मजला तूं रागावूं
म्हणे ' शकूला का मग देऊं ? '
नसूं दे तुझा, खाऊ पण सगळा माझा !

१९३८

# उचल फणा !

जाग घे अतां तरी
उचल् फणा, फणा उचल् !

बस्स टाक मूर्ख मौन
पड तुटून फूत्करून
गाय-गोगलेसमान
मरुं नकोस रे विफल् ! उचल् फणा, फणा उचल् !

म्हणवितोस तूं जरी
जायदाद-रक्षक
मानितात तक्षक
लोक हे तुला सकल, उचल् फणा, फणा उचल् !

म्हणतसें न ' डस ' म्हणून
दाविशील स्वाभिमान ?
मरशि कासया बनून
अंग अंग तरि विकल् ? उचल् फणा, फणा उचल् !

हसत मरण कवळण्यांत
होय कुतुक जरि जनांत
गणि विवेक त्यास मूर्ख—
आत्मघात रे निवळ, उचल् फणा, फणा उचल् !

ऑगस्ट १९५०

# पंचगंगा

पंचगंग नद संथ वाहतो!
वितरत मधुवन, फुलवित जीवन
बिंबित हृदयीं दृश्यें सुन्दर
पंचगंग नद संथ वाहतो!!

तिथेंच बाजुस तीरावरतीं स्मशानभूमी!
जीवनकलहीं जे का ठरले पूर्ण निकामी–
जीव असे ते लहानमोठे
जिथें पहुडती,
ओढुनि अपुल्या अंगावरतीं–
नखशिखान्त ती राखी चादर.
आणि जेविं निद्रेंत तरळती डोळयांपुढतीं–
विचित्र त्या स्वप्नांच्या माळा
त्यापरि त्यांच्या डोईवरतीं
घालिति घिरट्या असंख्य घारी
रेतित कपऱ्या कवट्या हाडें–
विखुरलिं दिसती जिकडे तिकडे
पाहुनियां जें येत शिसारी.

तेथुनि कांहीं अंतरावरी
शिलाखंडि मी होतों बसलों
शेज अंथरुनि थकल्या माझ्या मित्रासाठीं,
सोडुनि इतरां त्या नदिकाठीं
विचार होतों करीत, किंवा
चर्वित वेदांताचीं पानें
'पांचांची तर सारी सृष्टी,

देहाचें हें मडकें नश्वर—
फुटायचें आहेच कधीं तरि

असार जीवित माया केवल
ब्रह्म सत्य ' अन् कांहि यापरी.
प्रेत वाहुनी खांदा होता ठिणकत चमकत
म्हटलें ' हेंही मिथ्याच न का ? '
तें न पटुन पण,
मूर्ख हात त्या खांद्यालागीं होते चोळित.
तोंच शब्द कानांवरि आले,
' श्रीराम जयराम——'
कुणी तरी भागला बिचारा
चौघांच्या खांद्यावर बसुनी
दिसला मजला लपकत हबकत
वळतांना अन् याच दिशेला.
गरिब बिचारा !
अप्रिय दर्शन तें टाळाया
नजर वळविली अन्य दिशेला.
तिथें नदीच्या पात्रामध्यें
तरुणी कोणी—
वांकुनि मडकें भरीत होती,
आणि तेथुनी,
दहाच अवघ्या हातांवरतीं,
दृश्य पाहिलें दुजें मनोहर
जवळच रुंद शिळेवरि एका
धुवीत होती अवघड जाजम—
धरुनी चारी टोकां
रजक कुटुम्बांतिल तीं चौघें.
बहुधा सासू सून तयांतुन दोन बायका,
दोन पुरुष ते बाप लेक अन्;
निर्मिति चौघें यापरि अपुलें दैनिक जीवन !

तेंच दृश्य मी बघत राहिलों
किती निराळें त्या दुसऱ्याहुन !
इकडे मडकें, तिकडे मडकें;
इकडे चौघे, तिकडे चौघे;
परंतु अन्तर त्यांत केवढें ?
पंच-नदाच्या प्रवाहावरी
दृश्य बघुन तें हो मन वेडें !
इकडे मडकें फुटतें,
तिकडे भरतें !
इकडे चौघां हातावरती उभें राहतें जीवन मूर्त!
तिकडे चौघा खांद्यांवरुनी—
मरण येतसे लपकत दबकत !
पंचनदांच्या कांठावरतीं
चौघांचा सहकार असा तो;
तसाच पूर्वीं, तसाच आतां,
अन् शेजारीं—
फुलवित जीवन, उभवित मधुवन
पंचगंग नद संथ वाहतो !

जून १९५०

# परमेश्वर आहे!!

परमेश्वर आहे ?
आहे परमेश्वर !
कुशींत भूमीच्या-
जीवन-रस भरुनी,
मांसल गांडुळ हे
निर्मियले कोणी ?
जनक तरी त्यांचा-
कोण दुजा, बोला ?
परमेश्वर आहे ?
आहे परमेश्वर !
ताम्ररसाच्या या-
सजीव मृदु तारा,
भूरंध्रांमधुनी
अलग खेंचणारा-
अन्य स्वर्णकार
कोण तरी, बोला !
परमेश्वर आहे ?
आहे परमेश्वर !

तशाच या भवतीं—
काडमुंगळ्या, ज्या—
तया डसूं निघती,
ेवि व्यथा हृदया,
कोण पिता त्यांचा
तेंहि सर्वेच वदा;
परमेश्वर आहे ?
आहे परमेश्वर !

ताम्रशलाकांचा—
कारागीर जसा,
जीव-यातनांचा
तमासगीर तसा
कवण दुजा, बोला !-
करीत या लीला ?
परमेश्वर आहे ?
आहे परमेश्वर ! !

ऑगस्ट १९५०

## त्र्यंबक भटजी—

‘ त्र्यंबक भटजी, त्र्यंबक भटजी,
कुठें चालली स्वारी घाईत इतुकी–
पटपट उचलित पाउल ऐशा ऐन दुपारीं ? ’
‘ नित्याच्याच उपाधीपाठीं !
पोट लागलें पाठिस, नच का ?
खंविस पेन्शनर टोंकावरचा
घड्याळ लावुन असेल बसला;
आहों दम्पति ! ’
‘ कुटुम्ब कोठें ? ’
‘ येतें आहे मागुन;
पेशा अमुचा भिक्षुक ब्राह्मण ! ’

हंसून भटजी पुढें सरकती
आणि समोरुन येत असे तो—
भटजींचा समवयस्क तरणा शालुसोबती
बुटासुटांत;
पत्नीसह निज हांसत खिदळत !
हळूच भटजी वळुनी मागें बघती
‘ कुटुंब आहे अजुन मागल्या वळणावरतीं !
अजुनी इतुकें मागें ? ’
मनिं भटजींच्या हुरहुर लागे
व्यर्थ तरी पण !
त्र्यंबक भटजी भिक्षुक ब्राह्मण !
त्र्यंबक भटजी ! त्र्यंबक भटजी !

भटजींच्या तुळतुळीत वर्तुळ डोईवरतीं
सूर्य तापतो रखरखीत !
संवगड्याची विनोदबुद्धी करि तो जागृत
तोही वात्रट पुसतो

‘ का रे त्र्यंबक,
नेस कुठें हें खांद्यावरुनी ताजें पपनस ?’
यावरि पिकते खसखस पतिपत्नींत;
लाजल्यापरी किंचित्,
भटजी फिरविति डोईवरुनी हात
वळुन पहाती;
‘ कुटुंब आहे दूर, चांगलें ! ’
अशा विचारें अन् निःश्वासा सोडित
त्र्यंबक भटजी ! त्र्यंबक भटजी !

माध्यान्हींची आग वरोनी ओते
पायतळीं तापल्या तव्यासम तापे धरती
भटजींना तें अतां जाणवे कोठें !
खडे बोचती;
सरावलेले; तरी वरोनी पाय निसटती
त्या सर्वांहुन
भटजींना पण गमते राहुन
‘ कठीण ढांसळल्या श्रद्धांवर आधरलेलें अपुलें जीवन ! ’

चढतें जीवन-मान प्रतिक्षण,
ढळता जनिंचा धर्मभाव अन्;
संसाराचा प्रतिवार्षिक वाढता पसारा
पंचाइत प्राप्तीची;... ’
विचार यापरि उसळ मारिती अतृप्त चित्तीं
भटजी व्याकुल होती,
डोइवरन निथळतें घर्मजळ आणि निपटिती
‘ हुश्श करिति क्षण उभे राहुनी छायेमाजीं
त्र्यंबक भटजी ! त्र्यंबक भटजी !

जून १९५१

# विलाप करितो अज हा—

विलाप करितो अज हा कोणी इन्दुमतीस्तव
सहज धीरता-पौरुष सोडुनि, कवटाळुनि शव
दीन होय मन त्या पाहुनियां मृत्युचेष्टिता
सहानुभूती आणि अनुभवा विकलगात्रता
' मरणं प्रकृतिः ' वचन सावरी परी मानसा
सरसावे वेदांत पीडिता देउं दिलासा

वीरपतिकलेवरासन्निधीं पत्नी विधवा
स्तिमिता शोकें बाह्यतः परि अन्तरिं लाव्हा !
' फुटेल उरिं ही दुःखभरानें, ' सचिंत परिजन
अचेष्ट बघतां दुःखमूर्ति ती विकल होय मन
अशा क्षणिं मग उपाय योजिल चतुरा कोणी
फुटेल पान्हा, स्फुरेल जीवन अर्भकदर्शनिं
पण,—
जीवन-दीप विझाला, तेथें पणती जळते
उजळित तळिंच्या हिरव्या ओल्या सारवणातें
तेथें अर्भक दो वर्षांचें आईवेडें
आईसाठीं राहुन राहुन रडे बापुडें
अजाण-समजुत काळावांचुन कोण काढिता ?
लुळेपणा ये शब्दा जेथें, मना शून्यता !

नोव्हेंबर १९५४

# एकच दांत

पथिक पथीं कुणि क्षणैक चरके,
अंग शहारे भरे कांपरें,
आणि पदतळीं पांचोळाही
शहारल्यापरि कांहि सळसळे.

अन्तरावरी आणिक पडती
घाव इळयाचे ' सप् सप् ' कोठें,
' हन्त हन्त ' प्रति घावामागें
शब्द चिवारीमाजीं उमटे.

कापड-पेठेमधिल दुकानीं
चुकचुकुनी हळहळते कातर,
मांजरपाटामधुनि कातरित
' चराचर ' वदे ' नश्वर ! नश्वर ! '

घटविक्रेता करितो उचलुनि
मडकें कुणि कम्बक्त निराळें
विस्मय खेद भरें अन् तेंही
आ वासुनि पथ अपुला चाले

एकच दांत, क्षणैकच टंकन;
आणि फुग्यासम जीवित फुटलें !
बिंदुमात्र वमनांतच तळिंच्या
उमदा शिरिंचा मोहोर गळे !

डिसेंबर १९५०

## माझी पत्नी

‘ पत्नि’स माझ्या समजती सर्व सान
परी पाठीं तिज व्याप थोर कोण !
आवरीतां संसार तिचा सारा
कुटुंबाचे वाजती तीन तेरा.
बोळकीं तर एवढाएवढालीं
त्यांत शिजविल तरि किती ती बिचारी ?
जेवणारां वरि कधि न समाधान
म्हणे जो तो की वाढ आणखीन.
तिला फुरसत ना क्षणाची कशी ती
नित्य धांदल अन् उडे तिची मोठी
खाउ खाऊ करितात नित्य पोरें
कुणी रडतें हंसतें कुणी बिचारें
थारवीतां त्या सर्व लेकरांस
‘ पत्नी ’ येते स्वतःच कीं रडीस.
पहा, न्हाउनि ये आज जों घरांत
पोर लागे तो रडूं अकस्मात.
कुणा ऐकुं न तें रडे जरी येई
जीव खालीं वरि माउलिचा होई.
टुवालाचा मग पदर घेउनीयां
लावि पोरातें तयाखालिं प्याया
नेसणें मग तिज कसें तरि सुचावें ?
नेसण्याचें राहून कां न जावें ?

ऑगस्ट १९५१

# अप्पाजी

रस्त्यामधून रहदारीचा
चालतो लोट,
आणि वरतीं—

कांठच्या घरांत, निरुंद सज्जांत
अप्पाजी बैसती आराम खुर्चीत;
टाकून खालीं दृष्टीचा गळ—
स्नेहाची मासोळी त्यांतून हेरीत,
तेव्हढा म्हणती ‘ जाईल वेळ
जाईल वेळ ! ’

घर सारें शून्य भिंगुळवाणें
टकटका दारें-खिडक्या पाहती
जणूं रोखून ताणले डोळे !
अप्पाजी बापुडे !
धैर्य ना तयांस
वळवावयास नजर तिकडे.

अप्पाजी आहेत पिताजी बरें !
आहेत सासरे, आजोबा आहेत;
अप्पाजी आहेत जुनाट खोड,
ऐसपैसश्या विस्तारलेल्या—
वंशवृक्षाचें !

शाखा परन्तू फांकल्या दूर
सोडून जयास तापत उन्हांत,
अप्पाजी आहेत वठलें खोड
नाहीं वेलीचीही जयास संगत;
आहेत विधुर कधीं काळचे !

अप्पाजींचा क्रम असाच रोजचा;
यापरीच ते बसून सज्जांत
दिवस कंठिती.

गत रात्रीची परन्तु कठीण!
डोळ्यास डोळा जरा लागतो—
तोंच पडे त्यांना स्वप्न कांही तरी
आणीत जाग, करीत बेचैन;

दचकून जाग यापरी येतां
वाटे तयांना, ' भिंतीहि काय
सरकती दूर जागा सोडून?'
छप्पर दिसे उंचावलेलें,
पांखे पसराया सिद्ध जाहलें;
पाहूनीया तें—
अप्पाजी होती क्षणैक पिसे
भ्रान्त-चित्तसे.
अप्पाजी आहेत कृषक कंगाल!
अप्पाजी आहेत कुबेर निर्धन!

ऑगस्ट १९५०

# नियति-सुंदरी

माझा प्रमाद हा सारा,
एकांतीं पाहिली चोरुनी विरलवसन सुन्दरा ! ॥ ध्रु० ॥

दिन-रात्रीचें दार खोलुनी
चोर पाउलें जात येउनी
कोण अशी अज्ञातवासिनी
कुतुहल हें मजला ॥ १ ॥

यशांसि कवण्या विकसविणारी
अन्यां निर्दय कुस्करणारी
अशी देवता लहरी जहरी
देखियली डोळां ॥ २ ॥

सामुद्रिक मज भेटे कोणी
नेई मज तो तिचिया स्थानीं
तया-सहायें जाळीमधुनी
दृक्क्षेपचि केला ॥ ३ ॥

तया दर्शनें पिसें मज जडे
पुनर्दर्शना मन हो वेडें
चळे चित्त, पाऊल वांकुडें
पडे तया वेळां ॥ ४ ॥

होराभूषण कोणीं दुसरा
नेई मजला तिच्या मंदिरा
डोकावुनि मी गवाक्ष-द्वारां
हेतु पुरा केला ॥ ५ ॥

घडला दृग्व्यभिचार, पाप हें
घोर क्षुद्र वा, अजि फळ लाहे

अन् मी शापित जीवन वाहें
वसंतिं तरु वठला ॥ ६ ॥

तेथुनि माझें मनगट पिचलें
होय पांगुळा, पौरुष खचलें
दैवाच्या कुबड्यावरि चालें–
जीवित-पथ अपुला ॥ ७ ॥

एप्रिल १९५०

# या निशा...

'जी निशा सर्व भूतांची तींत संयमि जागती
जागतात जई जीव ती निशा मुनि मानिती'
यापरी परमात्मोक्ती गीता-पुस्तकिं वाचुन
उत्पक्ष्मनयनीं होतों यावत् करित चिंतन,
भिंतीवरी समोरील अंधारा कोन साधुन
दिसलीं वाघुळें ठेलीं योगनिद्रेंत टांगुन.
संगती लावुं ये कैसी? कासया व्यर्थ शोधन?
चमत्कृतिसुखानंदीं घटना देउं सोडुन!

१९४९

# परीटधुण्यावर—

बांधले फासीं जसे का, हे लहंगे टांगले
आणि सद्रे वाघुळांसम येथ उल्टे लोंबले
धोतरें, साड्या तशा या घेत देहा टांगुनी
प्रखर माध्यान्हा तपस्या करित किंवा राहुनी
अंगिचें मालिन्य वा तीर्थोदकों प्रक्षालुनी
येथ सूर्योपासना हे करित वा योगासनों ?
कोण ही उग्रा तपस्या! वायु भक्षुनि राहणें—
या अशा माध्यान्हकालीं, करित हीं योगासनें ?
पाहुनी हीं घोर कृत्यें होत मानस व्याकुल
कां परन्तु, बा मना! ही व्यर्थ यांस्तव हळहळ ?
नीट यांचें ध्यानिं घे चारित्र्य तूं दैनंदिन;
चित्त जाइल चिन्तनें उद्विग्न केवळ होउन!
झांकिलीं कोणीं वरोनी दुष्ट निर्घृण अन्तरें
देहिंचें मालिन्य कोणीं रम्य रंगें झाकिलें.
स्वार्थ नंगा अन्य कोणीं शुभ्र रंगें दडविला
पापमार्गें जोडिला पैसा कुणी अन् लाटिला.
भासवी कोणी म्हशीतें जाहलीसें अप्सरा
सजविलें उच्चैःश्रवासें कुणि निजांगें अन् खरा
झांकुनी सत्या असत्यातें प्रतिष्ठा द्यावया
जन्म यांचा निर्मुनी भासां जनां वञ्चावया.
मायावी हे, तपःसाधना यांची ही मायावी!
व्यवस्थेंत जी गोंधळ करण्या नित्य नवी माया वी.
पूर्विल पुण्याइ नवें पाप मात्र पचवाया;
निष्ठुरता यांविषयीं, हीच खरी होय दया!

ऑक्टोबर १९५२

## सखये अमुचें जीवन—

सखये, अमुचें जीवन दिसतें
उपनगरांतिल लोकल थांबा;
एक्स्प्रेस आणिक मेल अम्हांला
अलभ्य जैशा ऊर्वशि रंभा!
मडमांपरि कुणि सिगार फुंकित
तोऱ्यांतच जायच्या पुढोनी;
निसटायाच्या तशा सफाईंत
दुज्या सुंदरी चपला इथुनी!
रखडगाडि ती अपुल्यासाठीं
जाइल टेकित टेकित वाट,
झुंबडगर्दी यांतच दिसते—
लिहिली अमुची संगत-सोबत;
विजल्यांसम त्या अंगावरुनी—
सुवर्णसंधी उडत जायच्या,
येथुनि आम्हां कधीं न सखये!
या जन्मीं जणुं लाभायाच्या!

डिसेंबर १९५०

# ग्रंथालयांत—

ग्रंथालयिं मी जेव्हां जेव्हां जातों
तेव्हां तेव्हां मज हा अनुभव येतो—

मेजांवर वाऱ्यांत सुखावत पडल्या—
वेधिति पत्रें मजला देउनि टाळ्या.
'बघ, किति गमती जमति आम्हांपाशीं'
मज गमतें, तीं यापरि कांहीं म्हणती.
आणि, फळ्यांच्या दुपाख उतरंडीवर
दिसति मासिकें मज कवळाया आतुर.
हात चिमुकले पसरुनि जणुं 'घे' म्हणती
'उचलुनि आम्हां,' गोजिरवाण्या मूर्ती.
अन् इतिहास-निबंध-चरित्र-कपाटीं
ग्रंथ-पुस्तिका कांचांतुनि पुटपुटती
'बसलों कधिचीं हीं पोषाक करोनी
नेइ फिराया परी न आम्हां कोणी'
तिकडे, नाट्यकथादि विभागांमधलीं
मळक्या अंगरख्यांचीं उणगीं सारीं
पाय जयांचा सदाच पुढतीं आधीं
करिती एकच माझ्यापुढतीं गर्दी.
पाहुनि त्या सर्वां मन माझें द्रवतें
कुणास त्यांतुन तरी करावें परतें ?
काढित त्यांची 'उद्यां'वर समजूत
घेउन एका धरिं मी घरची वाट.
झुलवित यापरि प्रतिभेटींत तयांना
दिस महिने अन् वर्षें गेलीं नाना;
'होत असे ग्रंथींही तिकडे भरती
इकडे जीवन-पृष्ठें अमुचीं सरती'—
विचार हा मज नित्यच व्याकुळ करितो
ग्रंथालयिं मी जेव्हां जेव्हां जातों.

१९५१

# घरास अपुलें असावें देवघर !

| | |
|---|---|
| तुझ्या घराला, | असूं दे कोपरा |
| जिथें दैवतां | मिळावा आसरा |
| श्रद्धा न तुझी | परन्तु भाविकां– |
| रुचेल पूजा | बायकां बालकां |
| नरमति भोळी | रमावी उत्सवीं |
| सहजचि वा हें | मनीं तूं वागवीं |
| अवतारां या | युगांच्या स्मारकां |
| कृतकृत्यां, ना | गणावें देव कां ? |
| समाजशक्ति | बनावा दैवत |
| हेंच हिताचें | जनांच्या, निश्चित |
| घरास अपुलें | असावें देवघर; |
| कोठी असावी | भराया अडगळ ! |

१९५१

## जाहिर सभा—

स्वातंत्र्य चौक;
पांचाचा सुमार;
रस्त्याच्या कडेला, ध्वस्त देवळाच्या
सभा-मंडपांत,

रस्त्याच्या दिशेला करून तोंड
ठेविलीं आहेत टेबल-खुर्ची,
अंथरली आहे पुढ्यांत बैठक;
कोनांत उभा फळा एकला,
आजच्या सभेची जाहिरात ती !
येणारा जाणारा थांबून वाचीत
' गंभीर अन्न-धान्य-परिस्थिती
जाहिर चर्चा. '
जरा घोटाळून,
रिकाम्या सभामंडपाकडे—
नजर टाकून,

वाचक अलग पुढें सटके
सभाचालकांचें, आणि, टोळकें
श्रोतयांची वाट पहात आहे
मुद्रेनें गंभीर अन् धीरोदात्त !

जरा वेळानें सभा सुरू होत
पाहून पाहून श्रोत्यांची वाट;
मंडपांत आतां बैसलीं दिसतीं—
कांहीं शाळू पोरें,

आणीक स्कूलबोर्डांमधल्या—
उमद्या शिक्षिका;

हजेरी आपुली लावीत आहेत!
बाजारांतून परतलेले संसारी जीव,
पाहून सभेचा रागरंग थोडा-
जाण्याचा बेत करीत, इकडे वळत आहेत.

वक्त्याचा आवाज-
' अन्नधान्यस्थिती गंभीर आहे
नेहरू-सरकार आहे पेचांत
करा सहकार!
तकवा धरा; बकवा थांबवा
सर्कार आपुलें!!
आपुलें सर्कार!!! विश्वास धरा '
अधून मधून
खुर्चीमधुनी प्रेरणा होतांच,
फडफडतात दुबळ्या टाळ्या;
उनाड पोरें मारिती खडे-
पुढीलांच्या डोई,

तेव्हढीच नामी संधी साधून;
आणि, अध्यक्ष वटारूनी डोळे
पाही त्यांकडे.

वक्ता बोलतो भाषण पुढें—
' हात सर्कारांचे बळकट करा;
उमेद धरा!

अन्नाविण कांहीं जीव जात नाहीं!
अन्नाहून थोर जीवनमूल्यें—
असावीं मानवी ' वगैरे वगैरे
आणि, शेजारच्या मशिदीमधूनी
पुकारी बांग मौलवी कुणी
राहून उभा पश्चिमाभिमुख
उंच मिनारांत,

खालून बोटें दोन्ही कानांत.
समोरच्या घरीं ओसरीवरूनी
साथ तयातें कुक्कुट देत,
आणि समोरी—
चौकाभोवतीं उभे राहून
करीत आहेत रिकामटेकडे
तमाखू-पान.

दिसती समस्त अन्तरांत स्वस्थ
टाकून आपुला भरिभार सारा
खुदाचे खांदां;

'आपुलें काम आपुला धंदा!'
तोच तयां भारी!
मधुनी कुणी
वक्त्याच्या शब्दांची तारीफ करी
आणि, उभ्या उभ्या क्षण थांबुन
सभेचा रागरंग पाहून
लौटत घरा—
बिचारे टांगले जीव संसारीं!

एप्रिल १९५१

## अस्पताल !

अस्पताल ! अस्पताल !
मृत्यूच्या छायेंतिल
विकलगात्र जीवांची
जीवनार्थ हालचाल !
अस्पताल ! अस्पताल !

त्या भयाण शांततेस
बेगुमान उरिं ताडित,
त्वरत नितळ लादिवरुन
बूट मधुनि टपकतात
उग्रतेंत टाकित भर,
अस्पताल ! अस्पताल !

शुभ्रवेष परिचरगण
निर्विकार ! यंत्रसदृश
कळसूत्री बाहुल्याच—
त्या, सहानुभूतिशून्य !
मूर्त योग गीतेंतिल !
अस्पताल ! अस्पताल !

शुभ्रवेष हे डॉक्टर
मृत्यूचे द्वंद्वकार;
गोठल्या दयेचे जणुं
हालती हिमप्रस्तर !
निर्विकार ! थंडगार !
अस्पताल ! अस्पताल !

रुग्णांचे आर्त स्वर,
दीन बंधुजनचर्या;
म्लानता इतस्ततः

दुःखाचा कीं दर्या—
हेलावत, कण्हत हाल;
अस्पताल! अस्पताल!

विविध औषधें हवेंत
मिसळितात उग्र दर्प,
त्याहुनि परि दर्शितातित
अधिकारी जन सदर्प,
तुसड बोल, घिसड चाल?
अस्पताल! अस्पताल!

चखचखल्या शस्त्रांची
कांचांतुन तीक्ष्ण नजर
काळजास भेदित ये,
कर त्यांत प्रयोगशील–
इथले, मग कोण कहर!
अस्पताल! अस्पताल!

काळाचे द्वंद्वकार
इथें स्वतः होत काळ;
यमपुरिच्या भीतीहुनि
यातना इथेंच घोर!
अनघांचें काराघर!
अस्पताल! अस्पताल!

जानेवारी १९५१

# रोज सकाळीं सायंकाळीं—

रोज सकाळीं सायंकाळीं
मी त्या घरट्यावरुनी जातों,
भिरभिरणारा माझा डोळा
नित्यच अन् त्या ठायीं रमतो;
घरट्यापुढल्या उखड अंगणीं
दिसे पुरुष तो खडाच बहुधा,
रमवित जवळी चार लेकरें
क्वचित् थोपटित एका खांदा.
खोलगटिंत तें बैठें घरटें
उभार अन् टेकाड पुढारां,
पाहुन मज जातांना वरुनी
सस्मित विलगत ओठ बिचारा
शेजारीं त्या पांगेऱ्याचा
कांटेरी तरु करि त्या सोबत,
कधीं सुपुष्पित, विपर्ण किन्तू
कधीं पत्रिनें नूतन शोभित!
रोज सकाळीं सायंकाळीं
मी त्या घरट्यावरुनी जातों
गांवकऱ्यांच्या रहदारीचा
मार्गच अमुचा नित्याचा तो.
दृश्य तेंच तें सांजसकाळीं
मासामागुन मास, पाहिलें
सारवलेल्या अंगणिं मज परि
गोपद्म कधीं नाहीं दिसलें

अंगणिच्या त्या पांगेऱ्यावर
आली गेली कितिदां पत्री
कितिक उलटले मार्गेसर, पण–
बघत तेंच तें मी जणुं चित्रीं !
रोज सकाळीं सायंकाळीं
मी त्या घरट्यावरुनी जातों,
सस्मित त्या पुरुषा अन् पाहुन
कौतुकपूर्वक नमस्कारितों.

एप्रिल १९५१

# आनंदी आनंद !

उन्हें कोवळीं—
हिरव्या चाऱ्याच्या मऊ गादीवर
बालकापरी लोळत आहेत,
मंद झुळुकेंत;
दृष्टी कवीचीहि सुखावुनी तेथें
आहे रमली.
तिकडे कोनांत मोळीवाली कोणी
चार कापीत, बांधीत पेंढ्या,
तारुण्य अंगींचें, चापल्य हाताचें
प्रकट करीत आहे चालली.
मधुर आनंद वातावरणीं—
भरुन राहे,
ज्यांत कवीचें मानस पोहे;
अंतरीं कल्पना मधुर गुंफीत,
मोळीवालीसवें—
यमक-प्रासांच्या जुडग्या बांधीत.
सर्वत्र आहे आनंदी आनंद !

माध्यान्ह सुमार;
वाडीवाडींतून, आळीआळींतून
मोळीवाली आहे थकली हिंडून;
कविपत्नी आहे उभी दारांत,
म्हणत पतीला, ' पहा आली किनी ?
चुकायचं नाहीं माझं गणित !
सहा आणे मुळी भावच नाहीं '
थडकत तों मोळीवाली तेथ;
सौदा पटतो दहा पैशांत;
आणि होउनी भार हलका,
मोळीवाली जरा करिते ' हुश्श ! '
कवि म्हणतो, ' चतुर बायका ! '
( तयामागुनी एक सुरका
आणखी ' इश्शऽ ' )
आनंदी आनंद !

भर माध्यान्ह !
सूर्य तापतो आहे प्रखर;
झोपडीचिया वळचणीस
चिमणीं बहीण भावंडें दोन
बैसलीं आहेत,
' आये 'च्या वाटेस डोळे लावून,
सकाळपासून !
अखेर आयेची मूर्ति दिसते
दूर ! मळ्यांत,
दौडत आणि दुक्कल धावते
सावरीत वाटां हातीं करगोटे—
कमरेवरून घरंगळते.
पुढील दृश्य:
आकाशींचे चंद्र—
( अलग ! अखंड ! )
करतलगत झाल्याच्या हर्षांत,
चिमणे जीव—
टुण् टुण् उड्या मारीत आहेत,
धरून हातीं मुरमुरा-लाडू
दोन आण्यांचे;
आणखी ' आये ' चघळीत आहे
पानतमाखू, दोन पैशांचें !
घरकुलांत त्या यापरी आनंद !

कविगृहांतहि टेबलापाशीं
आकारत आहे सौंदर्यगीत
चितारित ' गोड—
ग्रामीण जीवनामधील आनंद '
होऊन स्फूर्तीच्या जोषांत धुंद.
आनंदी आनंद !

ऑक्टोबर १९५२

## श्रीहरि ! श्रीहरि !

हिरवा जळविस्तार समोरी
अविरत राहे तळिं हेलावत
अनंत अन् विस्तार नभाचा
वरुनी विश्वा प्रेमें कवळित
उभ्या दिसाचा श्रमला, तपला
सूर्य खाडिच्या तोंडीं डुंबत,
पसरुनि अपुल्या मनोहर भुजा
जलपृष्ठावरि संथ तरंगत.
पाय दुमडुनी मागें पोटीं
मान लांबवुनि निरुंद पुढती,
पीतचंचु अन् समुद्रपक्षी
पल्याड घरट्याकडे परतती.

प्रशांत असल्या संध्यासमयीं
खाडिकांठिं कवि बसतां येउन,
हेलावुनियां वृत्ति तयाच्या
अनंतिं लय पावे त्याचें मन.
गमलें त्याला, ‘ साक्षात् प्रभुची
करुणा हाले सागररूपें ’
‘ भिरीभिरी वाहता पवन, ’ त्या
गमलें, ‘ श्रीहरि, श्रीहरिच जपे ’
खाडिकांठच्या खडकांतळिचा
लाटांचा ध्वनि ‘ डुबुक् डुबुक् ’ तो,
गमलें त्याला, श्रीहरिभजनीं—
हलगीची कीं साथ करीतो.
भक्तीनें भारल्या तन्मना
गमलें, ‘ रमलें विश्व कीर्तनीं. ’
पल्याड डुलत्या बघुनि नारळी,

तोहि लागला डोलूं कवनीं;
'हे विश्वंभर, करुणा सागर!
विश्वमूर्ति तूं प्रभो, अनंता,
दयासागरीं तुझ्या, पोहतें
विश्व मासळीपरी सर्वथा'
यापरि कीर्तनिं कवि जों रमतो,
करताळांचा नाद जहाला;
जणूं तयाच्या हरीकीर्तनीं
साथ भक्तिची निज द्यायाला.
नादें अवचित करताळांच्या
चमकुनि पाहे कवि जों मागुतिं,
दालदियांचीं घोळदार तीं
जाळीं टाळ्या देतां दिसती.
दृश्य बघुनि तें कवि चरकला
मूढमना अन् बनला क्षणभरि,
शिरले पाहुनि पायघोळ ते—
संत कीर्तनीं अपुल्या यापरि.
वाऱ्याची पण चालुंच होती
यथापूर्व ती चर्पटपंजरि;
स्मरुनि मासळी अन् जळतळिंची
कवीहि वदला 'श्रीहरि! श्रीहरि!'

एप्रिल १९५१

## चर्चा—

मळसूत्री यंत्रावर
  दोन पिपीलक हुशार
आलापीं जो रमले,
  तों तळिचें यंत्र हले.
चिपकुनि त्या धरुनि नीट
अजमाविति जों संकट,
भय क्षणांत विरुनि, तयां
  होय स्फूर्ति विवदाया.

एक वदे ‘ चक्रगती—
  फिरताहे बघ जगती;
तेंच तेंच दृश्य फिरुनि
  येइल वा केविं नयनिं ? ’
दुजा वदे मतभेदें,
  ‘ अर्धसत्य केवल, हें !
परिभ्रमणिं भासमान
  उन्नत जग होताहे. ’

‘ संशय मज या विषयीं, ’
  जों न प्रथम हें वदतो,
पृष्ठभाग यंत्राचा
  तक्तपोशिला भिडतो;
वाद सरे अविनिर्णित;
  वादपटू आटपती;
ज्ञात यंत्रचालक अन्
  रिपेरीस वळताती !

सप्टेंबर १९५२